# श्रीहर्षदेवकृतित्वेन

प्रसिद्धं

# नागानंदनाटकं,

प्राकृत छायया सहितं,

श्रीमतो हावर्डस्य

सार्वजनीन लोकशिक्षणाधिष्ठातुः

आज्ञया

चिपळुणकरोपनाम्ना

कृष्णशास्त्रिणा

संशोधितं.

तत्

मुंबय्याख्यराजधान्यां

गणपत कृष्णाजीत्यभिधानां मुद्रायंत्रालये मुद्रितं.

शकाब्दाः १७८७.

किंमत चौदा आणे

# प्रस्तावना.



संस्कृत भाषा जाणणाऱ्या व्युत्पन्न वाचणारांस मूळ संस्कृत ग्रंथ व मराठी भाषांतर हीं सहज ताडतां यावीं व साहित्यांतील रस दुसऱ्यांत किती आला आहे हें समजावें, व संस्कृत भाषेची ज्यांस प्रीति असेल, त्यांस ती शिकण्यास कांहीं अंशीं सहाय व्हावें; तसेंच जुने संस्कृत ग्रंथ रहावे व लोकांत विशेष प्रसृत व्हावे, असे अनेक उद्देश मनांत आणून एका पृष्ठावर संस्कृत मूळ व एका पृष्ठावर मराठी भाषांतर अशा रीतीनें हा ग्रंथ छापला आहे.

संस्कृत नाटकें छापण्या पासून आणखी असा एक उपयोग आहे, कीं त्यांत बालभाषा असते; तिचा अभ्यास लक्ष्य देऊन केला असतां हल्लींच्या चालू प्राकृत भाषा शिकणारांस फार उपयोग आहे. बालभाषेंत महाराष्ट्री, मागधी, पैशाची अशा कांहीं शाखा आहेत, व त्या सर्व संस्कृतभाषेचा अपभ्रंश होऊन उत्तरोत्तर झाल्या आहेत. तेव्हां ज्ञानेश्वरी सारखे जुनेग्रंथ व जुने लेख समजावयास व हल्लींच्या मराठी, गुजराथी वगैरे भाषा संस्कृतांतून कशा उत्पन्न झाल्या हें समजण्यास बालभाषेचें ज्ञान फार उपयुक्त आहे. बालभाषेची संस्कृत छाया ग्रंथीच्या शेवटीं जोडली आहे.

मूळ संस्कृत ग्रंथ फार दुर्मिल असल्यामुळें जी एकच प्रत मिळाली तीवरूनच तो छापण्यास तयार करावा लागला. आतां ज्या प्रतीवरून तो तयार केला, ती जरी सर्वथैव शुद्ध नव्हती, तरी चांगली उपयोगी पडण्या सारखी होती, तींतील अशुद्धें प्रायः लेखकांच्या अज्ञाना मुळें उत्पन्न झाली होतीं; यास्तव वास्तविक व शुद्ध पाठविचार केला असतां समजण्या-

सारखें होते. जसें नांदीच्या प्रथम श्लोकांत " मारवधूभिः " असा त्या प्रतींत पाठ होता, त्या स्थळीं " वारवधूभिः " हा शुद्ध पाठ सहज लक्ष्यांत येतो. तसेंच तिसऱ्या अंकांतील दाहऱ्या पद्यांत " शशिनं दृष्ट्वा " असा पाठ होता, तो अशुद्ध आहे व त्या स्थळीं " शशिनं जित्वा " असा पाठ असावा हें विचार केला असतां समजतें. चवथ्या अंकांतल्या तिसऱ्या पद्यांत " अहूर्यजलकुंजरेंद्र " असा पाठ होता. त्यांत " अहूर्यत् " या शब्दांचा अर्थ कांहींच होत नसल्यामुळें " उद्गर्जत् असा पाठ केला आहे. या दोन पाठांतील अक्षरांच्या आकृतीचा विचार सूक्ष्म दृष्टीनें केला असतां लेखकप्रमादानें शुद्ध पाठापासून अशुद्ध पाठ होण्याचा संभव पराकाष्ठेचा आहे असें चतुर वाचणारांचे लक्ष्यांत सहज येईल. या प्रमाणें जीं थोडीं बहुत अशुद्धें होतीं, तीं विचार करून नीट केलीं आहेत; मोठा फेरफार कोठेंही केला नाहीं.

कृष्णशास्त्री चिपळुणकर

पुणें, नवंबर १८६२. दक्षिणा प्रैज कमितीचे सेक्रेटरी आणि रिवायजर.



# नागानंदनाटकं



ध्यानव्याजमुपेत्य चिंतयसि कामुन्मील्य चक्षुः क्षणं ?
पश्यानंगशरातुरं जनमिमं, त्रातापि नो रक्षसि ॥
मिथ्याकारुणिकोसि; निर्घृणतरस्त्वत्तः कुतोन्यः पुमान् ?
सेर्ष्यं वारवधूभिरित्यभिहितो बुद्धोजिनः पातुवः १

कामेनाकृष्य चापं, हतपटुपटहं वल्गुभिर्मारवीरै
र्भ्रूभंगोत्क्षेपजृंभास्मितललितदृशा दिव्यनारीजनेन॥
सिद्धैःप्रह्वोत्तमांगैः पुलकितवपुषा, विस्मयाद्वासवेन,
ध्यायन्योयोगपीठादचलितइतिवः पातु दृष्टोमुनींद्रः २

# नागानंद नाटक.



## नागानंद नाटक.

### प्रारंभ

### अंक १

### मंगलश्लोक.

शार्दूल विक्रीडित वृत्त

ध्यानव्याज[1] धरोनि चिंतिसि मनीं कोणास रे, चक्षुसी[2]
उद्घाटूनि[3] पहा स्मरातुरजना, त्राता न तूं रक्षिसी.
नाहीं आढळला पुमान् तुज असा निष्ठूर दंभी[4] अम्हां
ऐसें ज्याप्रति बोलल्या सुरवधू तो बुद्ध[5] रक्षो तुम्हां ॥ १ ॥

स्रग्धरावृत्त.

कामें[6] ओढूनि चापा, बडवुनि पटहा[7] मन्मथाच्या भटांनीं[8],
भ्रूभंगा हास्यरंगा करुनि निरखिला दिव्यनारी जनांनीं,
सिद्धांनीं नम्र माथे करुनि विनविला, विस्मयें पाहि इंद्र
ध्यानातें[9] सोडिना जो चिर सुखद असो तो तुम्हातें मुनींद्र[10] ॥२॥

---

१ मिष. २ नेत्रांस ३ उघडून. ४ ढोंगी ५ जैनमतप्रवर्तक.
६ मदनानें ७ दुंदुभि ८ मदनाच्या सैनिकांनीं ९ बौद्धयोग १० बुद्ध.

## नांद्यंते सूत्रधारः

अद्याहमिंद्रोत्सवे सबहुमानमाकार्य्य, नानादिग्देशागतेनराज्ञः श्रीहर्षदेवस्य राजर्षेःपादपद्मोपजीविना राजसमूहेनोक्तःयथा, यदस्मत्स्वामिना॰श्रीहर्षदेवेनापूर्ववस्तुरचनालंकृतंविद्याधरजातकेप्रतिनिबद्धं नागानंदनामिनाटकं कृतमित्यस्माभिः श्रोत्रपरंपरया श्रुतं, नचप्रयोगतोदृष्टं॰तत्तस्यैवराज्ञो बहुमानादस्मासुवा॰नुग्रहबुध्या यथाप्रयोगेण त्वयानाटयितव्यमिति. तद्यावदिदानीं नेपथ्यरचनां कृत्वा यथाभिलषितं संपादयामि। परिक्रम्यावलोक्यच। आवर्जितान्येवच मया सामाजिकानां मनांसीति मे निश्चयः। यतः।

श्रीहर्षोनिपुणः कविः, परिषदप्येषा गुणग्राहिणी,
लोकानंदिच बोधिसत्वचरितं, नाट्येच दक्षावयं,
वस्त्वैकैकमपीह वांछितफलप्राप्तेः पदं, किंपुन
र्मद्भाग्योपचयादयं समुदितः सर्वोगुणानांगणः॥ ३॥

तद्यावद्गृहिणी माहूय संगीतकमनुतिष्ठामि। परिक्रम्य नेपथ्याभिमुखमवलोक्यच। आर्यैइत स्तावत्

( ततः प्रविशतिनटी )

**नटी** ( सास्रं) अज्ज इयम्हि

( मंगलाचरण झाल्यावर सूत्रधार येतो.

**सूत्रधार** — आज ह्या इंद्रप्रस्थांत श्रीहर्षराजाच्या पाद कमलाच्या आश्रयानें उपजीवन पावणारा राजासमूह नाना देशाहून आला आहे. त्यानें मला बहुमान पुरःसर बोलावून सांगितलें कीं, अरे सूत्रधारा, आमचा स्वामी श्रीहर्षदेव ह्यानें विद्याधरजातकावर नागानंदनामक अपूर्व नाटक रचिलें आहे, असें आम्ही कर्णोपकर्णीं ऐकतों; पण त्याचा खेळ डोळ्यांनीं अझून पाहिला नाहीं. ह्यासाठीं त्याच राजाच्या बहुमानास्तव, किंवा आम्हांवर अनुग्रह करण्याकरितां, त्या नाटकाचा खेळ आम्हांला करून दाखीव. तर आतां सोंगांची तयारी करून सभासदांची इच्छा पूर्ण करतों. ( इकडे तिकडे फिरून पुढें पाहून ह्मणतो. ) वाहवा! सभासदांचीं अंतःकरणें तर मी आपल्या स्वाधीन करून घेतलीं ह्यांत संशय नाहीं. कांकीं

## श्लोक.

### शार्दूलविक्रीडित वृत्त.

श्रीहर्षासम बुद्धिमान् कवि, सभा हे ही गुणग्राहिणी,
लोकां आवड बोधिसत्वचरितीं[1], नाट्यांत मी अग्रणी,
हें एकेक असे मनोरथफलप्राप्तीस हेतू महा,
येथें तों गुण सर्व एकवटले, मद्भाग्य मोठें अहा ! ३

तर आतां स्त्रीस बोलावून गाण्यास आरंभ करितों. ( पुढें जाऊन पडद्याकडे तोंडकरून स्त्रीस बोलावतो. ) आर्ये, इकडे ये.

( इतक्यांत नटी बाहेर येते )

**नटी** — ( डोळ्यांस पाणी आणून म्हणते. ) आर्या, ही मी

---

१ बुद्धावतार.

आणवेदु अज्जउत्तो कोणिओओ अणुचिट्ठिअदुत्ति ॥

**सूत्र॰** विलोक्य । आर्ये, नागानंदनाटके नाटयितव्ये किमिदमकारणमेव रुद्यते ?

**नटी॰** अज्ज, कधं ण रोदिस्सं ? जदो तादो अज्जए सह ठेरभावजादणिव्वेदो कुडंबभारुव्वहणजोग्गो दाणिं तुमंति आरोविअ हिअए तवोवणं गदोत्ति.

**सूत्र॰** कथंमामपि परित्यज्यवनंप्रयातौ ! ( विचिंत्य ) किमिदानीं युज्यते कर्तुं ? अथवा कथमहं गुरुशुश्रूषासुखरसं परित्यज्य गृहे तिष्ठामि.

पित्रोर्विधातुं शुश्रूषां,
त्यक्त्वैश्वर्यं क्रमागतं,
वनं याम्यहमप्येष,
यथाजीमूतवाहनः ४

तदेहि मंदिरमेव गच्छावः

( इति निष्क्रांतौ )

( प्रस्तावना )

( ततः- प्रविशति जीमूतवाहनो विदूषकश्च )

**नायकः** । सखे आत्रेय,

रोगस्यास्पद मित्यवैमि नहिमे ध्वंसीतिन प्रत्ययः,
कृत्याकृत्यविचारणासुविमुखं कोवा नवेत्ति क्षितौ,

आलें. आज्ञा करावी. तुमचें कोणतें काम करावयाचें आहे ?

सूत्र०— ( तिजकडे पाहून ) आर्ये, नागानंद नाटकाचा खेळ करावयाचा आहे. पण तूं रडतेस ह्याचें कारण काय ?

नटी— आर्या, म्यां कसें रडूंनये बरें ! अहो, तुमचा वृद्ध पिता जो माझा सासरा, तो म्हातारपणामुळें संसारास कंटाळून पुढें कुटुंबभरणास तुम्ही योग्य झालां असें मनांत आणून तुमची माता, जी माझी सासू, तिला बरोबर घेऊन तपोवनास गेला. आतां आम्हीं काय करावें ?

सूत्र०— काय ? माझाही परित्याग करून उभयतां वनास गेलीं ! ( चिंतन करून. ) ह्यासमयीं कोणतें करणें मला योग्य आहे? अथवा विचार कशास पाहिजे ? आपणही तिकडे जावें हें योग्य. वडिलांच्या सेवेंत मला सुख वाटतें, त्या सुखाचा त्याग करून मी घरीं कसा राहूं ?

## गीतिछंद.

जोडाया गुरुसेवा, टाकुनि सौख्यास सर्वहि धनास,
जातों, पूर्वीं जैसा गेला जीमूतवाहन वनास ॥ ४ ॥

तर चल आपल्या मंदिरांत जाऊं

( असें बोलून सूत्रधार आणि नटी निघून जातात. )

॥ ही प्रस्तावना झाली ॥

( तदनंतर जीमूतवाहन[१] आणि विदूषक हे दोघे येतात. )

नायक— मित्रा आत्रेया, ऐकतोस.

## शार्दूलविक्रीडित वृत्त.

पापाचें घर हें मला कळतसे, नित्यत्व याला नसे,
कृत्याकृत्य विचार शून्य म्हणुनी हें ज्ञात सर्वां असे,

१ जीमूतवाहन हा ह्या नाटकांत मुख्य नायक आहे.

एवंनियमर्पीदमिंद्रियवशं, मीत्यै भवेद्यौवनं,

भक्त्या याति यदीत्थमेव पितरौ शुश्रूषमाणस्यमे. ५

विदूषकः ( सरोषं ) भो वअस्स णंणिव्विर्ण्णो एसोतुमं एत्ति-
अं कालं एदाणं जीविदानुगदाणं वड्ढकाण किदे इमं ईदिसं
वणवासदुःखंअणुभवसि. तापसीद इदाणिंपि दाव गुरुचलण
सुस्सूसाणिव्वंधादो णिव्वत्तिअ इछाभोअरमणीअं रज्जसुहं
अनुभविअदु.

नायकः सखे न सम्यगभिहितं, कुतः

तिष्ठन् भाति पितुः पुरोभुवि यथा सिंव्हासने किं तथा,
यत्संवाहयतः सुखं हिचरणौ तातस्य किं राजके
किंभुक्ते भुवनत्रये धृतिरसौ भुक्तोज्झिते वागुरो,
रायासः खलु राज्यमुज्झितगुरोर्मे नास्ति कश्चिद्गुणः ॥ ६ ॥

विदू० ( आत्मगतं ) अहो एदस्स गुरुचलणसुस्सूसाणुराओ !
( विचिंत्य ) इदंपि दाव भणिस्सं. ( प्रकाशं ) भो वअस्सण
खुअहं रज्जसुहं जेव्व केवलं उद्दिसिअ भणामि; अण्णंपि
दाव करणिज्जं अत्थि जेव्व.

नाय० ( सस्मितं ) वयस्य, ननु कृतमेव करणीयं. पश्य तावत्

ऐसें निद्य हि, इंद्रियांस वश ही, संतोषकारी तरी
मातें यौवन, सेवनांत गुरुच्या जाईल ऐसें जरी ॥ ५ ॥

**विदूषक—** (रागावून) अरे मित्रा, तूं संसाराचा त्याग करून एतावत्कालपर्यंत वांचणाऱ्या या म्हाताऱ्यांकरितां हें असें कठिण वनवासि दुःख अनुभवितोस! झाला काय म्हणावें! तर आतां कृपा कर, अजून तरी पितरांच्या शुश्रूषेचा आग्रह सोडून इष्टभोगानीं रमणीय अशा राज्य-सुखाचा अनुभव घे.

**नायक—** मित्रा, हें तूं चांगलें बोलला नाहींस; कांकीं,

## साक्या दोनचरणी.

पित्या पुढें कर जोडून उभें राहुनि शोभा कांहीं
जी आहे, ती नृपासनावर बसल्यानेंही नाहीं. १
गुरुच्या चरणाचें संवाहन करितां सुख चित्ताला
जें होतें, तें राज्यन देइल, तें उठवी पित्ताला. २
त्रिभुवन राज्यहि पदरायें तरि कष्ट पावतो काय।
भुक्तोज्झित वसुधेच्या भोगें हीयं अधिक तें काय ?.३
गुरुचरणाची सेवा सोडुनि राज्यसुखा लोभावें
यांत मला गुण विशेष न दिसे हें मी वदलों भावें. ४

**विदू०—** (मनांत म्ह०) काय हो ह्याचा गुरुचरणशुश्रूषेविषयीं प्रेमा हा! (चिंतन करून) आतां असें बोलावें. (उघडपणें म्हणतो.) मित्रा, मी केवळ राज्यसुखाच्याच उद्देशानें हें बोललों असें नाहीं. तर आणखीही कांहीं करावयाच्या गोष्टी राहिल्या आहेत.

**नायक—** (किंचित् हास्य करून) मित्रा, जें करावयाचें, तें मीं सर्व करून टाकिलें आहे. पहा.

---

१ त्रास देणारें आहे.

न्याय्ये वर्त्मनि योजिताः प्रकृतयः, संतः सुसंस्थापिता,
नीतो बंधुजनस्तथात्मसमतां, राज्येपि रक्षा कृता,
दत्तो दत्तमनोरथाधिककलः कल्पद्रुमोऽर्थिने,
किं कर्त्तव्यमतः परं, वद सखे, यत्ते स्थितं चेतसि ॥ ७ ॥

विदू० भो वअस्स, अच्चंतसाहसिको मतंगहदको दे पडिवक्खो, तस्सिंच समासण्णट्ठिते पहाणामच्चसमट्ठिदंपि तुएविणा रज्जं सुट्ठिदंति णमे पडिहादि.

नाय० किं मतंगहतको राज्यं गृहिष्यती त्याशंकसे ?

विदू० अधई.

नाय०— यद्येवं, ततः किं ? ननु स्वशरीरतः प्रभृति परार्थमेव सर्वं मया परिकल्प्यते. यच्च स्वयं न दीयते, तत्तातानुरोधात्. तत्किमनेन राज्यवस्तुना चिंतितेन ! वरंताताज्ञैवानुष्ठिता-आज्ञप्तश्चास्मि तातेन, यथा वत्स जीमूतवाहन, बहुदिव. सपरिभोगदूरीकृतसमित्कुशकुसुममुपभुक्तमूलफलकंदनीवारप्रायमिदं स्थानं वर्त्तते. तदितो मलयपर्वतं गत्वा तस्मिन्निवासयोग्यं किंचिदाश्रमपदं—

## दिंड्या दोनचरणी.

न्याय मार्गीं त्यां प्रजा लावियेली;
सज्जनांची संस्था हि नीट केली; १
बांधवांना स्वसमता अर्पियेली;
राज्य रक्षाही यथायोग्य केली; २
याचकांना दीधलीं सर्व दानें;
तयांच्या इच्छेहूनि अधिक मानें; ३
काय आतां कर्तव्य मला आहे;
सांग मित्रा, जें तुझ्या मनीं राहे; ४

**विदू०**—हे मित्रा, अत्यंत साहसिक असा जो **मतंग** हतक तुझा शत्रु, तो जवळ असतां प्रधानांवर जरी त्वां राज्य ठेविलें आणि त्यांनीं किती जरी संभाळिलें तरी तुझ्या वांचून राज्य सुरक्षित राहणार नाहीं असें मला वाटतें.

**नायक**— काय? तो **मतंग** हतक माझें राज्य घेईल असें तुला वाटतें?

**विदू०**— ह्यांत काय संशय?

**नायक**— जरी असें झालें तरी काय चिंता आहे! शरीर आदिकरून जितक्या वस्तू आहेत, तितक्या सर्व दुसऱ्यासाठीं योजिल्या आहेत. देतकां नाहीं म्हणशील, तर पित्यास वाईट वाटेल म्हणून देत नाहीं इतकेंच. असें असतां ह्या राज्यवस्तूविषयीं काळजी कशास पाहिजे? पित्याच्या आज्ञेप्रमाणें करावें हें बरें. पित्यानें मला अशी आज्ञा केली आहे कीं, वत्सा **जीमूतवाहना**, ह्या स्थळीं बहुत दिवस राहिल्यामुळें दर्भ, समिधा जवळ मिळत नाहींत, आणि फळें, मुळें, कंद, नीवार हींही आणतां आणतां संपून गेलीं आहेत, ह्या करितां येथून **मलयपर्वताप्रत** जाऊन त्या पर्वतावर राहण्यास योग्य असें एखादें **आश्रमस्थान**

निरूपयस्वेति. ततो यावन्मलयपर्वतमेवगच्छाव;

विदू. जंदेवो आणवेदित्ति.

( उभौपरिक्रामतः )

विदू० ( अग्रतोवलोक्य ) भो वअस्स, एसो खुसरसघण चंदणवणुस्संगपरिमिलणलग्गबहलपरिमलो विसमतडो पहदज्झज्झरिदणिज्झरुच्छलिदसिसिरसीअरासारवाही पढमसंगमुक्कंठिअप्पिआकंठग्गहो विअमग्गपरिस्समं अवणअंतो रोमंचेदि पिअवअस्सं मलअमारुओ.

नाय० ( विलोक्य ) अहो, वयं प्राप्ता एव मलयपर्वतं. ( सर्वतोनिरूप्य ) अहो रमणीयताऽस्य मलयाचलस्य ! तथा हि

माद्यत्कुंजरगंडभित्तिकषणैर्भग्नस्रवच्चंदनः,

क्रंदत्कंदरगह्वरोजलनिधेरास्फालितोवीचिभिः,

पादालक्तकरक्तमौलिकशिलः सिद्धांगनानां गतैः,

सेव्योयं मलयाचलः किमपि मे चेतः करोत्युत्सुकं ॥ ८ ॥

पाहून ये. तर आतां **मलयपर्वताकडेसच** जाऊं.

**विदू०**— जशी आपली आज्ञा.

( दोघे कांहीं पुढें जातात. )

**विदू०**—( पुढें पाहून म्हणतो .) हे मित्रा, हा सरस चंदनाच्या दाट झाडी वरून आल्यामुळें पुष्कळ परिमळ धरणारा, आणि पर्वतांच्या कड्यांवरून पडतांना फुटलेले जे उदकांचे प्रवाह त्यांचे शीतळ कण वाहणारा, असा हा **मलय** पर्वतसंबंधी वारा आमचा मार्गपरिश्रम दूर करून, प्रथम संगमाविषयीं उत्कंठित झालेल्या प्रियेच्या आलिंगनाप्रमाणें शरीरास रोमांचित करितो.

**नायक**—( पाहून ) अरे, आपण **मलय** पर्वतावर आलों काय ? ( चोंहोकडे पाहून म्ह० ) काय चमत्कारिक ह्या **म**लयपर्वताची शोभा ही ! पहा कशी ती.

## शार्दूलविक्रीडित वृत्त.

येथें चंदनशाखितें मदकरी गंडस्थळें घांशिती,
साली जर्जर होउनी परिमळें युक्ता रसा सांडिती,
लाटा आपटुनी बहूजलधिच्या तीरावरी वाजती,
मोठ्यानें गिरिच्या प्रतिध्वनिमुळें साऱ्या गुहा गाजती.॥८॥

## आणखी पहा.

सिद्धांच्या युवती उदंड बसती चालूनि भागोनियां,
झालीं रक्त शिलातलें चरणिचे आलक्त लागोनियां,
आली पुष्प फलादिकें करुनियां अत्यंत शोभा वना,
ऐसा हा मलयाद्रि सेव्य गमतो, औत्सुक्य आणी मना.॥९॥

---

१ चंदनवृक्षातें. २ मत्तहस्ती. ३ सुगंध. ४ समुद्राच्या ५ देवविशेष. ६ स्त्रिया. ७ लाख. ८ खडक. ९ अळिता. १० उत्कंठा.

तदेह्यत्रारुह्य निवासयोग्यं किंचिदाश्रमपदं निरूपयामः

( आरोहणं नाटयतः )

नाय० ( दक्षिणाक्षिस्पंदनं सूचयित्वा विमृश्य )सखे,

दक्षिणं स्पंदते चक्षुः,
फलाकांक्षा नमेक्वचित्,
नचमिथ्या मुनिवचः,
कथयिष्यतिकिंत्विदम् ?

विदू० भो वअस्स, आसण्णं दे पिअं णिवेदेदि.

नाय० एवं नाम यथा ब्रवीति भवान्.

विदू० भो[१०] वअस्स, पेक्ख पेक्ख एदंखु सविसेसघणसिणिद्धपाअवसोहिदं सुरहिहविग्गंधगब्भिदुद्दामधूमणिग्गममणुव्विग्गमग्गंसुहणिसण्णसावअगणंविअ लखिअदि.

नाय० सम्यगुपलक्षितं. तपोवनमेवैतत्. तथाहि.

वासोर्थेदययैवनातिपृथवः कृत्तास्तरूणां त्वचो,
भग्नानेकजरत्कमंडलु नभः स्वच्छं पयोनैर्झरं;
दृश्यंते त्रुटितोज्झिताश्चबटुभि मौंज्यःक्वचिन्मेखला,
नित्याकर्णनयाशुकेनचपदं साम्नामिदं गीयते. १०
तदेहि प्रविश्य विलोकयावः

( प्रवेशं नाटयतः )

तर आतां ह्या पर्वतावर चढून जाऊन राहण्यास योग्य असें एखादें आश्रमस्थान पाहूं चला.

( पर्वतावर चढल्या सारखें करतात. )

नायक— ( उजवा डोळा लवल्यासारखें करून विचार करून म्हणतो. ) मित्रा,

गीति.

उजवा डोळा लवतो, फल स्पृहा तों नसे मला कांहीं.
मुनिवच मिथ्या नोहे, सूचवितें काय हें कळत नाहीं.॥१०॥

विदू— मित्रा, मला वाटतें, तुला लाभ होण्याची वेळ जवळ आली आहे असें सूचवितें.

नायक— तूं म्हणतोस असें कदाचित् घडेल.

विदू— हे मित्रा, पहा पहा; हें स्थान, दाट पालवलेल्या वृक्षांनीं सुशोभित, आणि होमद्रव्यांच्या सुवासानें सुगंधित असा धूर ज्यांतून निघत आहे, आणि श्वापदसमुदाय भय सोडून वाटेवरच जेथें रोवंथ करीत बसला आहे, असें दिसतें.

नायक— त्वां चांगलें पाहिलें. अरे हें तपोवन आहे. कशावरून पहा.

शार्दूल विक्रीडित वृत्त.

नेसाया पुरत्याच सालि तरुच्या ह्या काढिल्या दीसती,
जेथें भग्न कमंडलूहि पडले ऐसे झरे वाहती,
मोळाच्या बहु मेखला[१] त्रुटित[२] त्या त्यक्ता बटूंनीं[३] पहा;
नित्यांच्या श्रवणेंकरूनि शुक[४] हे गातात सामें[५] अहा.॥ ११॥

तर चल आपण आंत जाऊन अवलोकन करूं.

( आंत गेल्या सारखें करतात. )

---

१ कटिसूत्रें. २ तुटक्या. ३ विद्यार्थ्यांनीं. ४ रांवे, ५ सामवेदांतील ऋचा.

A

नाय० ( प्रविश्यालोक्यच ) अहो, नुखलु मुदितमुनिजनप्रविचार्यमाणासंदिग्धवेदवाक्यविस्तरस्य पठद्बटुजनछिद्यमानार्द्रार्द्रसमिधस्तापसकुमारिकापूर्यमाणबालवृक्षालवालकस्य प्रशांतरम्यता तपोवनस्य।

इहहि.

मधुरमिव वदंति स्वागतं भृंगनादै,
र्नतिमिव फलनम्रैः कुर्वतोमी शिरोभिः,
ननु ददतइवार्घं पुष्पवृष्टिं किरंतः,
कथमतिथिसपर्यां शिक्षिताः शाखिनोपि ११

तन्निवासयोग्यमदस्तपोवनमतोभविष्यतीहवसतामस्माकं परानिर्वृत्तिः.

विदू० ( इतस्ततोविलोक्य ) [१]भोवअस्स, किंणुखु एदे इसिवलिअकंधरा णिच्चलमुहनिस्सरंतदरदलिददब्भगब्भकवला समुण्णमिददिण्णेककण्णा सुहसंमीलिदलोअणा आअण्णंताविअ हरिणा लक्खीअंदि

नाय० ( कर्णंदत्वा ) सम्यगुपलक्षितं.

स्थानप्राप्त्या दधानं, प्रकटितगमकं, मध्यतारव्यवस्था
निर्ह्रादिन्यांविपंच्यां, मिलितमलिरुतेनेव तंत्रीस्वनेन,

नायक—( प्रवेश करून इकडे तिकडे पाहून म्ह० ) कायहो हें तपोवन शांत आणि रमणीय दिसतें! येथें मुनिजन मोठ्या आनंदानें वेदवाक्याच्या अर्थाचा विचार करीत आहेत. इकडे विद्यार्थी मुखानें वेदपाठ करीत करीत हातांनीं पळस, उंबर इत्यादि वृक्षांच्या ओल्या समिधा काढीत आहेत. तिकडे ऋषिकुमारिका ल्हान ल्हान वृक्षांचीं आळीं पाण्यानें भरीत आहेत!

आणखी हे वृक्ष पहा.

## मालिनी वृत्त.

मधुपमधुरशब्दें बोलती स्वागतातें,
करिति फळनतांहीं मस्तकांहीं नतीतें,
करुनि कुसुमवृष्टी अर्घ हे काय देती,
तरु अतिथि पुजेची शीकले येथ रीती.

हें तपोवन रहावयास योग्य आहे. येथें राहिलों असतां आम्हांस परम सुख होईल ह्यांत संशय नाहीं.

विदू०—( इकडे तिकडे पाहून ) मित्रा, पाहिले काय हे हरिण? माना वांकड्याकरून निश्चल उभे राहिले आहेत. दर्भाचे ग्रास अर्धे खाऊन अर्धे तसेच मुखांत धरिले आहेत, आणि एकेक कान उभारून सुखानें डोळे मिटून कांहीं श्रवण करीत आहेत असे दिसतात.

नायक—( कान देऊन ) मित्रा, त्वां चांगलें पाहिलें. ऐकतात खरें.

## स्रग्धरा वृत्त.

स्थानाच्या प्राप्तिनें जें प्रकट, धरितसे मध्यतार क्रमाशीं,
वीणेच्या जें मिळालें भ्रमर रवसमा गोड तंत्रीस्वनाशीं,

एते दंतांतरालस्थिततृणकवलच्छेदशब्दं नियम्य
व्याजिह्मांगाः कुरंगाः स्फुटललितपदं गीतमाकर्णयंति, १२

विदू० भोवअस्स, को णु खु एसो तवोवणे कंपि सोहणं उववीणअदि ?

नाय० यथा कोमलांगुलिलताभिहन्यमाना नाति स्फुटं क्वणंति तंत्र्यः, काकलीप्रधानंगीयते, तदाकर्णयामि. ( अंगुल्यग्रेणाग्रतो निर्दिशन् ) अस्मिन्देवतायतने देवतामाराधयंती काचिद्दिव्ययोषिदुपवीणयति.

विदू० भोवअस्स, एहि अह्मेविएदं देवदाअदणं पेक्खह्म.

नाय० साधूक्तंभवता. वंद्यंतेदेवताः ( उपसर्पन्सहसास्थित्वा ) अहोवयस्य, कदाचिद्दृष्टुमनर्होयं स्त्रीजनो भविष्यति. तदनेनतावत्तमालगुल्मकेनांतरितौ देवतादर्शनावसरं प्रतिपाल्यावः.

( तथाकुरुतः )

ततःप्रविशतिभूमावुपविष्टांवीणांवादयंती मलयवतीचेटीच.

नायिकागायति.

उत्फुल्लकमलकेसर-
परागगौरद्युते,ममहि,गौरि,
अभिवांछितंसुसिध्यतु
भगवति,युष्मत्प्रसादेन. १३

चावायाही मुखींचें तृण विसरुनियां होउनी निश्चलांग,
ग्रीवां वक्रा करोनी श्रवण करिति हे गायनातें कुरंग.१२

**विदू०—** अरे मित्रा, ह्या तपोवनांत कोण बरें उत्तम प्रकारें वीणा घेऊन गातें ?

**नायक—** अरे, कोमल अंगुलींनीं छडल्यामुळें विण्याच्या तारा मोठ्यानें वाजत नाहींत, सूक्ष्म ध्वनि निघत आहे, आणि बारीक गळ्यावर कोणी गात आहे, तर ऐकतों थांब. ( बोटानें अग्रभागीं दाखवून ) ह्या देवालयामध्यें देवताराधन करणारी कोणी देवांगना वीणा वाजवून गात आहे.

**विदू०—** मित्रा, चल आपणही देवालयांत जाऊं.

**नायक—** बरें बोललास. देवतांस वंदन केलेंच पाहिजे. ( देवालयाजवळ जातां जातां अकस्मात् उभा राहून (म्ह० अरे मित्रा, आपण देवालयांत चाललों खरें, पण तेथें जी स्त्री आहे, ती कदाचित् पहावयास योग्य नसेल, ह्यासाठीं ह्या तमालवृक्षांच्या जाळीच्या आड उभे राहून देवता दर्शनाच्या समयाची वाट पाहूं ( असें म्हणून दोघे जाळीच्या आड उभे राहतात. )

( इतक्यांत **मलयवती** आणि चेटी येतात. )

**नायिका[२]—** ( भुईवर वीणा ठेवून वाजविते आणि गाऊं लागते. )

**गीति.**

हे भगवति, जगदंबे, देशीभक्तांशि इच्छितें दानें,
मद्वांच्छितसिद्धि घडो, माते, सत्वर तुझ्या प्रसादानें.

---

१ हरिण. २ मलयवती ह्या नाटकांतील ही मुख्य नायिका होय.

नाय० ( गीतमाकर्ण्य ) अहोवयस्य, अहोगीतं! अहोवादितं! तथाहि.

व्यक्तिर्व्यंजनधातुना दशविधेनाप्यत्र लब्धामुना,
विस्पष्टोद्रुतमध्यलंबितपरिच्छिन्नस्त्रिधायं लयः,
गोपुच्छप्रमुखाःक्रमेणयतयस्तिस्रोपिसंदर्शिता,
स्तत्वौघानुगताश्च वामविधयः सम्यक्त्रयोदर्शिताः १४

चेटी [14] भट्टिदारिए,चिरंखु तुएवादिदं णखुते पडिस्समो अग्गहत्थाणं ?

नायिका [15] हंजे चतुरिए,गौरिए पुरदो वादअंतीए कुदो मे पडिस्समोअग्गहत्थाणं ?

चेटी ( साधिक्षेपमिव ) [16] भट्टिदारिए,णंभणामि, किं एदाए णिक्करुणाए देवीए पुरदो वीणावादिदेण ? जा एत्तिअं कालं कण्णकाजणदुःकरेहिं णिअमोपवासेहिं आराधअंतीए ण दे पसाअं दंसेदि.

विदू० [17] भो वअस्स,कण्णका खुएसा; ताकिण पेक्खह्म ?

नायकः कोदोषः, कन्यकाहि निर्दोषदर्शनाभवंति किंतु कदाचिदस्मान्दृष्ट्वा बालभावसुलभलज्जासाध्वसात् नचिरमिह तिष्ठेत्.

**नायक—** ( गायन श्रवण करून म्ह० ) हे [1]मित्रा, काय गाणें आणि काय वाजविणें हें चमत्कारिक.

## शार्दूल विक्रीडित वृत्त.

व्यक्ती[1] व्यंजनं धातुला दशविधा ही पावली निश्चय,
विस्पष्ट [1]द्रुतमध्यलंबितपरिच्छिन्न त्रिधा ही लय,
गोपुच्छप्रमुखक्रमें करूनियां तीन्ही यती दाविले,
तत्वौघानुगती नवाप्तविधिही ते दाविले चांगले.

**चेटी—** हे राजकन्ये, फारवेळ पर्यंत तूं वीणा घेऊन गात बसली आहेस. तुझीं बोटें दुखूं लागलीं नाहींत काय ?

**नायिका—** अगे चतुरिके, गौरी पुढें मी गात आणि वाजवीत असतां माझीं बोटें कशींगे दुखतील ?

**चेटी—** ( तिरस्कार केल्यासारखें करून म्ह० )
राजकन्ये, मी असें म्हणतें, ह्या निर्दय देवीपुढें तूं येवढा वेळ वीणा वाजवीत आणि गात बसली असतां, आणि तुम्हासारख्या मुलींस करावयास कठीण अशा उपवासांनीं आणि नेमाधर्मांनीं आराधन करीत असतां ही देवी अद्यापि तुजवर प्रसाद करीत नाहीं. मग इतकें करून काय ?

**विदू—** ( ऐकून ) अरे मित्रा, ही कन्या आहे खचीत. मग हिला पहावयास काय चिंता ?

**नायक—** काय दोष ? कन्येचें अवलोकन निर्दोष आहे. पण [2]ती कदाचित् आपणाला पाहून बालस्वभावामुळें लज्जा व भय पावून फार वेळ एथें राहणार नाहीं.

---

१ [1] संगीत शास्त्राची परिभाषा ज्यास ठाऊक त्यास स्पष्ट कळेल.

२ हिचें लग्न झालें नाहीं असा भाव.

तदनेनैवतमालांतरेण पश्यावः ( उभौतथा पश्यतः )

**विदू०** (विलोक्यसविस्मयं) [18]भो वअस्स, पेक्ख पेक्ख, अच्चरिअंअच्चरिअं ! अपि ण केवलं वीणाविण्णाणेणकण्णाणं सुहं करेदि, इमिणा वीणाविण्णाणाणुरूवेण रूवेण अच्छीणंपि सुहं उप्पादेदि. काउण एसा भविस्सदि, किं दाव देवी, अह वा णाअकण्णआ आहो विज्जाहरदारिआ, उत सिद्धकुलसंभवेत्ति तक्केमि.

**नायकः** ( सस्पृहमवलोकयन् ) वयस्य, केयमिति नावगच्छामि; एतत्पुनरहं जानामि.

स्वर्गस्त्री यदि, तत्कृतार्थमभवच्चक्षुःसहस्रंहरेः;
नागीचेन्नरसातलं शशभृताशून्यं मुखेस्याःसति;
जातिर्नःसफलान्यजातिजयिनी, विद्याधरीचेदियं;
स्यात्सिद्धान्वयजा यदि, त्रिभुवनेसिद्धाःप्रसिद्धास्ततः. १५

**विदू०** ( नायकमवलोक्य सहर्षमात्मगतं ) दिट्ठिआ[19] चिरस्स दाव कालस्स पडिदो खु गोअरे मम्महस्स !

ह्मासाठीं ह्या झाडा आडूनच आपण तिला पाहूं. ( उभयतां झाडाच्या आडून तिजकडे पाहतात. )

विदू०— ( अवलोकन करून विस्मयानें म्ह० ) अरे मित्रा, पहा पहा, हें मोठें आश्चर्य ! ही वीणा वाजविण्याच्या कौशल्यानें केवळ कर्णांस सुख देते इतकेंच नाहीं; तर अशा कौशल्यास अनुरूप जें हिचें स्वरूप त्यानें नेत्रांसही सुख फार देते. तस्मात् ही कोण असेल हें कळत नाहीं. ही कोणी देवकन्या अथवा नागकन्या, अथवा विद्याधरकन्या, किंवा सिद्धकन्या असावी, असा माझा तर्क होतो.

नायक— ( सस्पृह अवलोकन करीत होत्साता म्ह० ) मित्रा ही कोण हें तर खचीत समजत नाहीं; पण मला इतकें वाटतें—

### दिंड्या दोन चरणी.

देवकन्या होईल जरि अहो ती,
सहस्राक्षाचे[१] अक्ष[२] धन्य होती;
नागकन्या, तरि नसे अधोभुवन[३]
रहित विधुनें[४],कीं असे तिचें वदन;
जरी विद्याधर वंशजात कन्या,
तरी अमुची झालीच जातधन्या;
सिद्धकन्या होईल, तरी सिद्ध
तिहीं लोकीं झालेच ते प्रसिद्ध. ४

विदूष०— ( नायकाकडे पाहून हर्षानें मनांत म्ह० ) मोठें दैव ! हा फार दिवसांनीं मदनाच्या झपाट्यांत सांपडला !

१ इंद्राचें. २ नेत्र. ३ पाताळ. ४ चंद्ररहित.

(आत्मानंनिर्दिश्य) अहवा णहि मह जेव्व एकस्स ब्रह्मणस्स.

चेटी ( सप्रणयकोपं ) [२०] भट्टिदारिए, णंभणामि, किंदाणि एदाए अकिदाल्हादाएं णिक्करुणाए देवीए पुरदो गाइदेण ? ( इतिवीणामाक्षिपति )

नायिका (सकोपं) [२१] हंजे, मा भअवदिं गोरिं अधिक्खिप. किदो मे भअवदीए अज्ज पसाओ.

चेटी ( सहर्षं ) [२२] भट्टिदारिए, कहेहि दाव कीदिसोसो.

नायिका [२३] हंजे, अज्ज सिविणए जाणामि, इमजेव्ववीणं वादअंती भअवदीए गोरीए भणिदह्मि. वत्से, परितुट्ठह्मि देएदिणा वीणाविण्णाणादिसएण इमाए बालभावदुल्लहाए असाधारणाए मज्झोवरिभत्तीए. नाविज्जाहरचक्कवत्ती देअइरेण सअंजेव्व पाणिग्गहणं निवर्त्तयिष्यति.

चेटी ( सहर्षं ) [२४] भट्टिदारिए, जइएव्वं, ताकीससिविण ओत्तिभणासि ? णंहिअअहिदो वरोजेव्वभअवदीए दिण्णो देवीए.

विदू० [२५] वंअस्स, अवसरो खुअम्हाणं देवीदंसणस्स, ताएहिउपसप्पह्म.

( उभौ देवालयं प्रविशतः )

विदू० ( अनिच्छंतमपिनायकंबलादाकर्षति ) [२६] भोदि चतुरिआसच्चंभणादि. वरो इदो जेव्व दे एसो दिण्णो दवीए.

नायिका. ( ससाध्वसमुत्तिष्ठति.

अथवा त्याच्या नाहीं, तर माझ्या एका ब्राह्मणाच्या म्ह- टलें तरी चिंता नाहीं.

**चेटी**— ( प्रेमानें व कोपानें युक्त होऊन म्ह॰ ) हे राजपुत्रि, मी असें म्हणतें, ही आपणास आनंद नदेणारी निर्दय देवी, हिच्या पुढें गाऊन काय फळ? ( असें म्हणून वीणा ओ- ढून घेते. )

**नायिका**— ( रागावून ) अगे भगवती, देवीचा तूं तिरस्कार करूं नको. आज भगवतीनें मजवर प्रसाद केला.

**चेटी**— ( हर्ष पावून ) राजपुत्रि, सांग सांग, कसा काय प्रसाद केला तो.

**नायिका**— अगे, आज स्वप्नामध्यें म्यां पाहिलें कीं, मी हीच वीणा देवी पुढें वाजवीत बसलें असतां, देवी मला म्हणा- ली, " वत्से, ह्या तुझ्या वीणा वाजविण्याच्या अति चा- तुर्यानें, आणि तूं अल्पवयाची असून माझी विशेष भक्ति केलीं, त्यायोगानें, मी तुजवर संतुष्ट झालें. तर विद्याधर चक्रवर्ती असा नवरा तुला मिळेल. तोच स्वतां येऊन तुझें पाणिग्रहण करील. "

**चेटी**— ( हर्षपावून ) अगे राजपुत्रि, जर असें आहे तर स्व- प्नांत पाहिलें असें कां म्हणतेस? तुझ्या मनांत जो होता, तोच वर तुला देवीनें दिला ह्यांत संशय नाहीं.

**विदू॰**— मित्रा, देवीचें दर्शन घेण्यास हाच समय चांगला आहे. तर॰आपण देवळांत जाऊं. ( असें म्हणून दोघे देवाळयांत जातात.

**विदू॰**— ( जीमूतवाहनास इच्छा नसतां बळेंच त्याला ओढून पुढें करतो. ) अगे मुली, चतुरिका खरें बोलली. देवीनें जो तुला वर दिला, तो हाच. पहा.

**नायिका**— ( घाबरून उभी राहते )

नायकमुद्दिश्य अपवार्य ) [२७]हंजे, कोउणएसो?

चेटी. ( नायकं निरूप्य ) [२८]ईदाए अणण्णसदिसाए आकिदीए एसोसो भअवदीए गोरीए पसाहोत्ति तक्केमि.

नायिका. ( सलज्जं सस्पृहंव नायकमवलोकयति )

नायकः.

तनुरियं तरलायतलोचने,
श्वसितकंपितपीनघनस्तनि,
श्रममलं तपसैवगता, पुनः
किमिति संभ्रम धारिणि, खिद्यते ? १६

नायि० [२९]हंजेअदिसिद्धसेण णसकुणोमि एदस्स पुरदो संमुहं ठाडुं.

(नायकं सलज्जं तिर्यक् पश्यंती किंचित्परावृत्त मुखी तिष्ठति )

चेटी. भट्टिदारिके, किणेदं.

नायिका. [३१]हंजे,णसकुणोमि एदस्स अच्चासण्णे वट्टिदुं, ताए हि अण्णदोगछह्म. ( इत्युत्थातुमिच्छति )

विदू० [३२]भोमित्त,अहं पुव्वपठिदविज्जावलेण संपदं एणा मुहुतअं धारेमि. ( विमृश्य ) भोदि किं तुह्माणं तवोवणे एरिसोआ आरो,

आणि जीमूतवाहनाला उद्देशून एकीकडे चेटीस म्हणते.) अगे चतुरिके, कोणगे हा पुरुष?

**चेटी**—(नायकास निरखून पाहून) ह्याच्या अलौकिक आकृतीवरून, गौरीनें जो प्रसाद दिला, तोच हा असा माझा तर्क होतो.

**नायिका**—(लाजेनें आणि उत्सुकपणानें नायकाकडे पाहते.)

**नायक**—(तिला उद्देशून म्हणतो.)

द्रुतविलंबितवृत्त.

तरल[1] विस्तृत[2] नेत्र तुझे, गडे,
श्वसित[3] कंप[4] तुझ्या ह्रदयीं जडे,
तनु[6] अधींच तपें श्रमली असे.
करिशि कष्ट कृशास पुन्हा असे?

**नायिका**— अगे चतुरिके, मला भय वाटतें. ह्यामुळें ह्याच्या पुढें माझ्यानें उभें राहवत नाहीं. (असें म्हणून नायकाकडे लज्जायुक्त वांकड्या दृष्टीनें पाहून कांहींशी वळून उभी राहते.)

**चेटी**— राजपुत्रि, हें काय असें करितेस?

**नायिका**— अगे, ह्याच्या जवळ माझ्यानें उभें राहवत नाहीं. ह्यासाठीं चल आपण येथून दुसरीकडे जाऊं (असें बोलून जावयास लागते.)

**विदू०**— मित्रा, ही तर निघाली, पण पूर्वपठितविद्यासामर्थ्यानें ही येथेंच दोन घटका राहील असें करूं की? करतों पहा. (विचार करून म्हणतो.) अगे मुली, ह्या तुमच्या तपोवनांत असाच संप्रदाय आहे काय?

---

१ चंचल. २ मोठे. ३ दम. ४ कांपरा. ५ उराला. ६ शरीर.

जं आगदो अदिही वअणमेत्तकेणावि ण संभावीअदि ?

**चेटी.** ( नायकमवलोक्य स्वगतं ) [33] अणुरत्ता दाव एत्थ एदाए दिठी. ता एदं दाव भणिस्सं. ( प्रकाशं. ) भट्टिदारिए, जुत्तं भणादि ब्राह्मणो. उचिदो क्खु देअदिहिजणसक्कारो. ता कीस एदस्सिं महाणुभावे एव्वं पडिवत्तिमूढा चिठसि; अहवा चिठ तुमं. अहं जेव्व जहाणुरूवं करिस्सं. ( नायकमुद्दिश्य) साअदं महाभाअस्स. आसणपडिग्गहेण अलंकरेदु इमं पदेसं अज्जो.

**विदू०** [34] भोवअस्स, सोहणं एसा चदुरिआ भणादि. उवविसिअ मुहुत्तअं विसमीअदु.

**नायकः.** युक्तमाह भवान् ( इतिउपविशति. )

**नायिका.** [35] अयिपरिहासशीले, माएव्वं करेहि जइ कदावि को वि तावसो पेक्खदि, तामं अविणीदेत्ति संभावेदि.

( ततः प्रविशति तापसः )

**तापसः.** आज्ञापितोस्मि कुलपतिनाकौशिकेन, यथा वत्स शांडिल्य, पितुराज्ञया युवराजमित्रावसुर्भविष्यद्विद्याधरचक्रवर्तिनं जीमूतवाहनमिहैवमलयपर्वते क्वापिवर्तमानं भगिन्या मलयवत्या वरहेतोर्द्रष्टुमागतः. तंच प्रतीक्षमाणाया मलयवत्या कदाचिन्मध्यंदिनसवनवेलातिक्रामेत्

कीं, कोणी अतिथि आला असतां त्याचा मधुर भाषणानें देखील सत्कार करावयाचा नाहीं ?'

**चेटी**— ( नायकाकडे पाहून मनांत म्ह० ) माझ्या सखीची दृष्टि तर ह्या पुरुषावर बसलीशी दिसते. ह्यासाठीं आतां असें बोलावें. ( उघडपणें म्ह० ) राजकन्ये, हा ब्राम्हण ठीक बोलला. आलेल्या अतिथीचा सत्कार करणें तुला योग्य आहे. असें असतां ह्या महानुभाव पुरुषाशीं अशी कां वागतेस ? अथवा तूं उगीच ऐस. मीच करावयास योग्य तें करतें. ( नायकास उद्देशून म्ह० ) महाराज, आपलें स्वागत असो. आसनावर बसून ह्या प्रदेशास अलंकृत करावें.

**विदू०**— मित्रा, ही **चतुरिका** फार चांगलें म्हणते. दोन घटका बसून विश्रांति घ्यावी.

**नायक**— बरें, तूं म्हणतोस तसें कां होईना. ( असें म्हणून बसतो. )

**नायिका**— ( चेटीस म्ह० ) अगे, तुला जेव्हां तेव्हां थट्टामस्करी करावयास पाहिजे. पण असें करूंनको. जर कदाचित् कोणी एकाद्या तपस्व्यानें पाहिलें तर " काय ही दांडगी मुलगी " असें तो मनांत म्हणेल.

( इतक्यांत एक तापस येतो. )

**तापस**— ( आपणाशीं ) आमच्या **कौशिक** गुरूंनीं मला आज्ञा केली आहे कीं, वत्सा **शांडिल्या**, पित्याच्या आज्ञेनें युवराज **मित्रावसु** हा, पुढें विद्याधर चक्रवर्ती होणारा जो **जीमूतवाहन** तो ह्या **मलय** पर्वतावर कोठें तरी असेल, तो आपल्या भगिनी **मलयवतीस** वर योजावयाकरितां त्याला पहावयास आला आहे. त्याची वाट पाहत बसतां **मलयवतीस** कदाचित् दोन प्रहर

तदेनामाहूयागच्छेति. ततोयावद्गौरीगृहमेव गत्वा मलयवतीमाकार्य गच्छामि.(परिक्रामन्नग्रतो भवनं निरूप्य)अथ कस्य पुनरियं पांसुलप्रदेशे प्रकाशचक्रचिन्हा पदपंक्तिः? (पुरतो जीमूतवाहनंनिर्दिश्य) नूनमस्यैवेयं महानुभावस्य पदवी. तथाहि.

उष्णीषः स्फुटएषमूर्धनि विभात्यूर्णेयमंतर्भ्रुवो,
चक्षुस्तामरसानुकारि, हरिणा वक्षस्थलं स्पर्द्धते,
चक्रांकं च यथापदद्वयमिदं, मन्ये तथा कोप्ययं
नोविद्याधरचक्रवर्तिपदवीमप्राप्य विश्राम्यति. १७

अथवा कृतं संदेहेन. सुव्यक्त मनेन जीमूतवाहनेन भवितव्यम्. (मलयवतीं निरूप्य) अहो! इयमपि राजपुत्री मलयवती! (उभौविलोक्य स्वगतं) चिरात्खलुयुक्तकारीविधिःस्या, यदियुगलमेतदन्योन्यानुरूपं, घटयेत्. (सहसाउपसृत्यनायकं निर्दिश्य) स्वस्तिभवते.

नायकः. भगवन्, जीमूतवाहनोभिवादये.

तापसः. आयुष्मान्भूयाः.

नायकः (आसनादुत्थातुमिच्छति)

तापसः. अलमलमभ्युत्थानेन ननुसर्वस्याभ्यागतोगुरुरितिभवानेवास्माकं

टळून जातील. ह्यासाठीं तिला बोलावून घेऊन य. तर आतां देवीच्या देवळांत जाऊन **मलयवतीला** बोलावून घेऊन जातों. ( इकडे तिकडे फिरून देवीच्या देवळाजवळ मार्गाकडे पाहून म्ह० ) ह्या धुळीवर चक्रांकित पावलें वठलीं आहेत, हीं कोणाचीं बरें? ( पुढें **जीमूतवाहनास** पाहून म्ह० ) हीं खचीत ह्याच महानुभाव पुरुषाचीं हीं पावलें. कशावरून तर.

स्रग्धरा वृत्त.

माथा उष्णीष शोभे, मकट लव दिसे अंतरीं भोंवयांच्या,
चक्षू रक्तोत्पलाशींसम, मृगपतिचें वक्ष वक्षाशिं याच्या.
चक्राचें चिन्ह पायावरि शुभ दिसतें, दृष्टिला सौख्य देतो,
वाटे विद्याधराचें बहुतकरुनि हा चक्रवर्तित्व घेतो.

अथवा संदेह नकोच. ह्याच **जीमूतवाहन.** ( **मलयवतीकडे** पाहून ) अहो ही राजपुत्री **मलयवती** येथेंच आहे. ( उभयतांकडे पाहून मनांत म्ह० ) जर ह्या उभयतांचा वरवधूसंबंधानें योग घडेल तर, **ब्रह्मदेव** फार चतुर आहे अशी कीर्ति त्याला बहुतां दिवसांनीं मिळाली असें होईल. ( अकस्मात् पुढें होऊन नायकास उद्देशून म्ह० ) तुझें कल्याण असो.

**नायक—** भगवंता मी **जीमूतवाहन** वंदन करितों.

**तापस—** दीर्घायू हो.

**नायक—** ( आसनावरून उठूं लागतो. )

**तापस—** पुरे पुरे, अभ्युत्थान कशास पाहिजे.
"* सर्वस्याभ्यागतो गुरुः" ह्या वचनानें तूंच आम्हांस

---

* घरीं आलेला अतिथि हा सर्वांस गुरु म्हं० पूज्य आहे हा याचा अर्थ.

पूज्यः. तथथा सुखंस्थीयतां. ( मलयवतीं प्रति ) वत्से, स्व स्तिभवत्यै.

नायिका. अज्ज[३६], पणमामि.

तापसः. ( नायकं निर्दिश्य ) अनुरूपभर्तृगामिनी भूयाः. त्वा माऽह्वयतिकुलपतिः कौशिकः, अतिक्रामति मध्यंदिनसवन विधिवेला. त्वरितमागम्यतां.

नायिका. जंगुरुआणवेदिति[३७]. ( उत्थायनिःश्वस्यच स्वगतं )

एक त्तो गुरुवअणं, अण्णद्दोदइअदंसणसुहाइँ,

गमणागमण विमूढं अज्जवि दोलाइ मेहिअअं. १८

( सलज्जंसानुरागंच नायकंतिर्यक्पश्यंती.

तापससहिता निष्क्रांता )

नायकः ( सोत्कंठंनिःश्वस्य नायिकांपश्यन् )

अनया जघनाभोगभरमंथरया नया

अन्यतोपि व्रजंत्यामे ह्दये निहितं पदं॥ १९

विदू०[३] भोदिट्ठं जंपेक्खिदव्वं, सुदं जं सोदव्वं; तादाणि मज्झग्ग सूरसंदावड्ढिगुणितोव्व मेजठरग्गी धमाधमाअदि; ताणिक्क मह्म. जेणब्रह्मणोअदिहीभविअ मुणिजणसआसादो लध्धेहिँ कंदमूलफलेहिँ पि दाव पाणधारणं करिस्सं.

नायकः ( ऊर्ध्वमवलोक्य) अये अयं मध्यमध्यास्ते नभस्तलस्य भगवा

पूज्य आहेस. तर आसनावर स्वस्थ बसावें. ( मलय-वतीस म्ह० ) वत्से, तुझें कल्याण असो.

**नायिका—** आर्या, मी प्रमाण करितें.

**तापस—**( नायकाकडे भेटकरून ) अनुरूप भर्ता तुला मिळो. मुली, कौशिक गुरु तुला बोलावतात, दुपार टळून गेली. लौकर यावें अशी त्यांची आज्ञा आहे.

**नायिका—** जशी गुरूची आज्ञा. (उठून उच्छ्वास टाकून मनांत म्ह० )

गीति.

एकिकडे गुर्वाज्ञा एकिकडे दयित दर्शनीं लाहो,
गमनागमनीं मूढचि मन माझें होय जेंवि दोला हो. .

( लज्जेनें आणि प्रीतीनें नायकाकडे वांकडी पाहत पाहत तापसाबरोबर निघून जाते. )

**नायक—** ( उत्कंठेनें उच्छ्वास टाकून नायिकेकडे पहात हो-त्साता म्ह० )

गीति.

जघनाच्याभारानें गमनहिचेंमंदजाहलें काय ?
जाते अन्यत्र परी माझ्याव्हृदयांत ठेविते पाय.

**विदू०—** मित्रा, पहावयास योग्य तें पाहिलें, आणि ऐकावयास योग्य तें ही ऐकिलें. आतां ह्या मध्यान्ह काळच्या सूर्यसंतापानें माझा जठराग्नि दुप्पट धडाडला आहे. ह्या साठीं चला आपण जाऊं. गेल्यानें मी ब्राह्मण कोणाचा तरी अतिथि होऊन मुनिजनापासून कंदमूल फळें मिळवून तरी प्राण धारण करीन.

**नायक—** ( वर पाहून म्हणतो. ) अरे ! खरेंच हा भगवान्

---

१ झोंपाळा.

-सहस्रदीधितिः ! तथाहि

तापात्तत्क्षणघृष्टचंदनरसौ पांडुकपोलौवहन्,
संसक्तैर्निजकर्णतालपवनैः संवीज्यमानाननः,
संभ्येषविशेषसिक्तहृदयो हस्तोज्झितैः सीकरै,
र्गाढापल्लकदुःसहामिव दशां धत्ते गजानां पतिः. २०

तदेहि आवामपिगच्छावः.

( इति निष्क्रांतौ )

प्रथमोंकः



सहस्त्ररश्मि सूर्य आकाशाच्या मध्यभागीं आला ! तेंच पहा.

शार्दूल विक्रीडित.

तापाच्या शमनार्थ चंदनरसा डोकें पहा घांशितो,
कर्णांचीं व्यजनें करूनि वृक्ष्मा वारा कसा घालितो,
सोंडेनें जळ शिंपुनी निज उरा ओलें करी मागती,
उष्णाचें बहु दुःख सोशित पहा आहे गजांचा पती.

---

तर चल आपणही जाऊं.

( असें म्हणून निघून जातात. )

पहिला अंक समाप्त.

## अंक २

( ततः प्रविशति चेटी. )

**चेटी.**- आणत्तह्मि भट्टिदारिआए मलअवदीए, जं हंजे मणोहारिए, अज्जचिरअदि मे भादुओ मित्तावसू; तालहु गदुअ जाणेहि दाव आगदो णवेत्ति. ता जहाणत्तं अणुचिट्ठामि. ( परिक्रामति ) ( नेपथ्याभिमुखमवलोक्य. ) का उण एसा इदो ज्जेवआअच्छदि ? अए ! कहं चउरिआ. !

( ततः प्रविशति द्वितीया चेटी. )

**प्रथमाचेटी.**— ( उपसृत्य ) हंजे चउरिए,— किंणिमित्तं तुए तुवरिदाए आअच्छीअदि. ?

**द्वितीयाचेटी.**-- आणत्तह्मि भट्टिदारिआए मलअवदीए, जं हंजे चउरिए, कुसुमावचअपडिस्समणीसहंखिण्णं मे सरीरं सरदादवजणिदो अअंमे संदावो अहिअदरं बाधेदि; ता गच्छ तुमं बालकदलीदलपरिक्खिते चंदणलदाघर

# अंक २

## प्रारंभ.

### पात्रें.

| | | |
|---|---|---|
| चेटीपहिली. | मनोहारिका. | मलयवतीची सखी. |
| चेटी दुसरी. | चतुरिका. | मलयवतीची सखी. |
| नायिका. | | मलयवती. |
| नायक. | | जीमूतवाहन. |
| विदूषक. | | त्याचा खेळगडी. |
| मित्रावसु. | | विश्वावसूचा पुत्र. |

( तदनंतर एक चेटी येते. )

**चेटी**— राजकन्या मलयवती हिनें मला आज्ञा केली आहे कीं, अगे मनोहारिके, माझा भाऊ मित्रावसु ह्यास जाऊन फार वेळ झाला. तर लौकर जाऊन पहा बरें तो अजून आला कीं नाहीं. तर आज्ञेप्रमाणें करतें. ( इकडे तिकडे फिरते आणि पंड्याकडे पाहून म्ह० ) ही कोणबरें इकडे येत आहे ? अरे ही चतुरिका !

( इतक्यांत दुसरी चेटी येते. )

**पहिलीचेटी**— ( जवळ जाऊन ) अगे चतुरिके, कां तूं इतक्या घाईघाईनें चाललीस ?

**दुसरीचेटी**— राजकन्या मलयवती हिनें मला आज्ञा केली आहे कीं, अगे चतुरिके, फुलें वेंचतां वेंचतां मी फार दमलें आहें. आणि ह्या शरत् कालच्या उन्हानें तर माझ्या शरीराची फारच आग झाली आहे, ह्यासाठीं तूं जा आणि बाल कदलींनीं परिवेष्टित जें चंदनलतागृह त्यांत

दावचंदमणिसिलादलं सज्जी करेहित्ति अणुचिट्ठिदं मए जहाणत्तं ता जाव गदुअ भट्टिदारिआए णिवेदम्हि.

प्रथमाचेटी— जइ एव्वं ता लहु णिवेदेहि, जेण से तहिं गदाए संदावो उवसमिस्सदि.

द्वितीयाचेटी— ( विमृश्यात्मगतं ) ऐइरिसो संदावो, जो एव्वंउवसमिस्सदित्ति विचित्तरमणिज्जं चंदणलदाघरं पेक्खंतीए अहिअदरं संदावो भविस्सदित्ति तक्केमि. ( प्रकाशं ) ता गच्छ तुमं. अहंपि सज्जं सिलदलंत्ति गदुअ भट्टिदारिआए णिवेदेमि ( इत्युभेनिष्क्रांते ).

( प्रवेशकः )

( ततः प्रविशति सोत्कंठा मलयवती चेटीच )

नायिका. ( निःश्वस्य आत्मगतं ) अयिहिअअ, तधा तस्सिं जणे लज्जाये मंपरम्मुही करिअ दाणिं अप्पणा तहिं जेव्व गदोसित्ति, अहो दे अत्तंभरित्तणं ! ( प्रकाशं ) हंजे, आदेसहि मे भअवदीए आअदणं.

चेटी. णंचंदणलदाघरं भट्टिदारिआ पत्थिदा.

नायिका ( सलज्जं ) हंजे, सुट्टुए सुमराविदम्हि, ताएहि, तहिंजेव्व गच्छम्ह.

चेटी एदुएदु भट्टिदारिआ.

चंद्रकांत शिलेवर मला निजायास जागा सिद्ध करून ये. तर तिच्या आज्ञेप्रमाणें मी केलें. आतां जाऊन राजकन्येला कळवितें.

पहिलीचेटी— जर असें आहे तर लवकर जाऊन तिला कळीव. म्हणजे ती तिकडे गेल्यानें तिचा संताप दूर होईल.

दुसरीचेटी— ( मनांत विचार करून म्ह० ) असला संताप तेथें गेल्यानें शांत होत असतो काय ? तें विचित्र रमणीय चंदनलतागृह पाहून अधिकच संताप होईल, असें मला वाटतें. ( उघड पणें म्ह० ) बरें तर तूं जा. मीही शिलातल सिद्ध केलें म्हणून राजकन्येस जाऊन कळवितें. ( असें बोलून दोघी निघून जातात. )

( हा प्रवेशक झाला. )

( इतक्यांत उत्कंठित झालेली मलयवती आणि चेटी येतात. )

नायिका— ( खेदाचा उच्छ्वास टाकून मनांत म्ह० ) बा हृदया, त्वां त्या समयीं त्या प्रियजनापासून लज्जेनें मला मागें सारून आतां तूं आपण स्वतां त्याजकडे गेलेंस ! वाहवा ! हा केवढारे तुझा आपलपोटेपणा ! असो. ( उघड पणें चेटीस म्ह० ) अगे चतुरिके, मला देवीचें देऊळ दाखीव.

चेटी— बाई, आपण चंदनलतागृहाकडे जावयास निघालां आहांना ?

नायिका— ( लाजून ) अगे, बरें त्वां स्मरण दिलें. मी अगदींच विसरलें होतें. तर चला आपण तिकडेसच जाऊं.

चेटी— राजकन्यके, इकडून अशी ये. मी पुढें चालतें; तूं माझ्या मागून चाल.

(चतुरिकातदेव चंदनलता गृहंयाति. नायिका अन्यतो गच्छति ).

चटी. ( पृष्ठतोदृष्ट्वा आत्मगंत सोद्वेगंच ) [११] अंहो से सुण्णहिअअत्तणं कहं तंजेव्व देवीभवणं पत्थिदा ( प्रकाशं ) भट्टिदारिए, इदो चंदणलदाघरं; ता एहिदाव.

नायिका. ( सविलक्षस्मितं गच्छति )

चेटी. [११] एदंचंदणलदाघरं. तापविसअ चंदमणिसिलादले उपविसदु भट्टिदारिआ.

( उभेउपविशतः )

नायिका. ( निःश्वस्यात्मगतं मदनावस्थां नाटयंती ) [१२] भअवंकुसुमाउध, जेणतुमं रूवसोहाएण णिज्जिदोसि, तस्सिं णकिंपितुए किदं. मज्झ उण अणवरुद्धाएवि अबलेत्ति करिअपहरंतो ण लज्जेसि ? ( प्रकाशं. आत्मानं निर्वर्ण्य मदनावस्थां नाटयंती )

हंजे, कीस उण एदं घणपल्लवणिरुद्धसुरकिरणं तादिसंजेव्व चंदणलदाघरं णमह अज्जवि संदावदुःखमवणेदि. ?

चेटी. ( सस्मितं ) [१३] जाणामि अहं एत्थ कालणं; किं उण असंभाविणी भट्टिदारिआ णतं पडिवज्जदि.

( **चतुरिका** त्या चंदनलतागृहाकडे जाते. आणि **मलयवती** दुसरीकडे जाऊं लागते. ).

**चेटी**— ( पाठीमागें पाहून, मनांत घाबरून म्ह० ) काय हो हिचा बेशुद्धपणा हा ! ही देहभानावर नाहीं ! इकडे यावयाचें सोडून देवीच्याच देवळाकडे चालली ! ( उघड पणें म्ह० ) बाईसाहेब चंदनलतागृह हिकडे आहे. हिकडे या. तिकडे कुठे चाललां ?

**नायिका**— ( खिन्न होऊन किंचित् हांसून माघारी फिरते. आणि चंदनलतागृहाकडे जाते. )

**चेटी**— हें चंदनलतागृह. ह्यांत प्रवेश करून चंद्रकांत शिलातलावर बसावें.

( दोघी आंत जाऊन शिलातलावर बसतात. )

**नायिका**— ( उश्वास सोडून, कामातुर झाल्यासारखी होऊन मनांत म्ह० ) हे भगवंता कुसुमायुधा मदना, ज्यानें आपल्या रूपशोभेकरून तुला जिंकिलें, त्याला त्वां कांहींच केलें नाहीं; आणि मी कांहीं अपराध केला नसतां ही अबला असें समजून मजवर शरप्रहार करितोस. ह्याची तुला लाज वाटत नाहीं काय ? ( उघडपणें आपल्या शरीराकडे पाहून कामातुर झाल्यासारखी होऊन चेटीस म्ह० )अगे, येथें पालवीच्या दाटी मुळें सूर्याचे किरण देखील खालीं पडत नाहींत असें हें थंड गार चंदन लतागृह असतां अजून हें माझें संताप दुःख दूर करीत नाहीं याचें कारण काय ?

**चेटी**— (किंचित् हास्य करून) ह्याचें कारण मी समजलें. पण आपणास विश्वास नसल्यामुळें आपण तें कबूल करीत नाहीं त्यास काय करावें ?

**नायिका.** ( आत्मगतं ) [१४]कहं लक्खिदाविअ अहं एदाए. तधा-
विपुच्छिस्सं. ( प्रकाशं ) हंजे, किं तव एदिणा ? कहेहि
दाव किंकारणं.

**चेटी.** [१५]एसो दे हिअएत्थिदो वरो.

**नायिका.** ( सहर्षं ससंभ्रममुत्थाय ततोद्वित्राणिपदानि दत्वा )
[१६]कहिंसो ?

**चेटी.** ( उत्थाय सस्मितं ) [१७]भट्टिदारिए, को ?

**नायिका.** ( सलज्जमधोमुखी तिष्ठति. )

**चेटी.** [१८]भट्टिदारिए, णं एतदम्हिवत्तुकामा, एसोदेहिअअक्खिदोव
रो ज्जेव देवीए दिण्णोत्ति सिविणए तुए भणिदो. तक्खणं
ज्जेव विमुक्ककुसुमबाणो विअ मअरध्धजो भट्टिदारिआए
दिट्ठो, सोदे इमस्स संदावस्स कालणं; जेण एदं सहावसी
अलंपि चंदणलदाघरं णदेसदावदुःखमवणेदि.

**नायिका** ( चतुरिकायाः अलिकं स्पृशंती ) [१९]हंजे, चउरिआ
क्खु तुमं, किं देअवरं पछादीअदि, ताकथइस्सं.

**चेटी.** [२०]भट्टिदारिए, दाणिं जेव्व कहिदं. किं बहुना पलविदेण ?
अलं संभ्रेण कामसंतावेण अ- जइ अहं चउरिआ, ता सो-
वि भट्टिदारिअं अपेक्खंतो ण मुहुत्तअंपि अण्णेहिं अहिर-
मिस्सदि, एदंपि मए लक्खिदं ज्जेव.

**नायिका.** ( सास्रं ) [२१]हंजे, कुदो अम्हाणं एदिसी भाअधेअदा ?

**चेटी.** [२२]भट्टिदारिए, माएव्वंभण. किं महुमहणो वच्छलेण लच्छीं
अणूव्वहंतोवि णिव्वुदोहोदि ?

नायि०— ( मनांत म्ह० ) काय ! माझ्या मनांतलें हिनें जाणलें वाटतें. तथापि हिला पुसावें. ( उघडपणें म्ह० ) सखे, असें काय बोलतेस ? कारण सांग काय तें.

चेटी— सांगूं का ? हा तुमचा ऱ्हदयस्थित वर.

नायि०— ( हर्ष पावून गडबडीनें उठून दोन तीन पावलें पुढें जाऊन म्ह० ) कुठे कुठे आहे तो !

चेटी ( उठून किंचित् हांसून म्ह० ) बाईसाहेब, कोण ?

नायि० ( लाजून खालीं पाहूं लागते. )

चेटी— अगे बाई, मी असें बोलतें होतें कीं हा तुमचा ऱ्हदय स्थित जो वर तोच देवीनें स्वमांत दिला असें आपण ह्मणालां, त्याचक्षणीं कुसुमबाण सोडणारा साक्षात् कामदेवच काय असा जो आपल्या दृष्टीस पडला, तोच ह्या संतापाचें कारण; ह्या मुळेंच हें चंदनलतागृह स्वभावानें शीतळ असतांही आपलें संतापदुःख दूर करीत नाहीं.

नायि० ( चतुरिकेच्या कपाळास हात लावून म्ह० ) सखे, तूं चतुरिका खरी. तुजपुढें म्यां काय चोरून ठेवावें ? आतां सर्व सांगतें.

चेटी— बाईसाहेब, हें आतां सर्व सांगितल्या प्रमाणेंच आहे ! फार बोलून काय फळ ? आपण घाबरूंनये व संताप करूंनये. जर मी खरी चतुरिका आहें तर, आपणास हेंही सांगतें कीं तो आपणास सोडून मुहूर्तभरही दुसरे ठायीं रममाण होणार नाहीं, हें खचीत आहे.

नायिका— ( डोळ्यांस पाणी आणून म्ह० ) अगे चतुरिके पण इतकें शुभ दैव आमचें कोठें आहे.

चेटी— बाई, असें ह्मणूं नका. अहो मधुमथन जो हरी तो वक्षःस्थळींच्या लक्ष्मीचा त्याग करून कधीं तरी सुख पावेल ?

**नायिका.** किंवा[२३] सिविणओ पिअं व ज्जिअअण्णं भणिदुं आ-णादि ? अदोवि मे संतावो एसो अहिअदरं. संबाधेदि, जंसो महाणुभावो वाआमेत्तकेणावि अकिदपडिवत्ती अद-क्खिणेत्ति संभावइस्सदि. ( इतिरोदिति ).

**चेटी** सास्रं [२४]भट्टिदारिए, मारोदिहि.

**नायिका.** ( सास्रं ) [२५]कंधं ण रोदिस्सं.

**चेटी.** [२६]अदिसअं से हिअअसंदावो बाधेदि, ताकिं दाणिं एथ जुत्तं भोदु ? तज्जेव चंदणपल्लवरसं हिअए देइस्सं. ( उत्साय सुमनःपल्लवं गृहीत्वा निपीड्य रसं ह्रदये ददाति. ) णं भणामि मारोद. अअं खु थणवट्टलदिण्णो चंदनपल्लवरा-इमेहिं अविरदपडंतेहिं बाप्फबिंदूहिं उण्हीकिदो णदे-हिअअस्स संदावदुःखं अक्खणेदि.

( कदलीपत्रमादायवीजयति )

**नायिका.** ( हस्तेन तांनिवारयति ) [२७]सहि, मावीजेहि. उण्हो खु एसो कदलीमारुओ.

**चेटी.** [२८]भट्टिदारिए मा इमस्स दोसं करेहि.

कणसि घणतरुणचंदणपल्लवसंसग्गसीअलंपि इमं.
णीसासहीं तुमंविअ कदलीदलमारुअं उण्हं. ?

**नायिका.** ( सास्रं ) [२९]सहि, अत्थि कोवि इमस्स संदावस्स उवसमोवाओ ?

नायिका— अगे, स्वप्नांत ही त्या प्रिया वांचून दुसरें कांहीं मला दिसत नाहीं. ह्यामुळें हा संताप मला अधिकच दुःख देतो, कीं त्या महानुभावाशीं मी एक शब्द देखील, कीं गे बोललें नाहीं., ह्यावरुन तो मला मूर्ख असें समजेल. ( असें बोलून रडूं लागते. )

चेटी— ( डोळ्यांस पाणी आणून ) बाई रडूं नका.

नायिका—( नेत्रांत अश्रु आणून ) अगे त्यां कसें रडूंनये ?

चेटी— ( मनांत ह्म० ) हिच्या ह्र्दयाला तर फारच संताप झाला आहे असें दिसतें. आतां येथें काय उपाय करावा; असो, तोच चंदन पल्लवाचा रस हिच्या ह्र्दयास लावावा. ह्मणजे कांहीं तरी हिचा ताप कमी होईल. ( चंदनाचा पाला घेऊन त्याचा रस काढून तिच्या उरास लावते. ) अहो, मी ह्मणतेंना, आपण रडूंनये ह्मणून ? हा आपल्या उरावरील चंदन रस नेत्रांतून वारंवार दुःखाचे अश्रुबिंदु पडतात ह्यामुळें उष्ण होऊन आपलें संताप दुःख दूर होत नाहीं. ( मग केळीचीं पानें आणून त्यानीं वारा घालते. )

नायिका— ( हातांनीं तिचें निवारण करिते. ) सखे, नको गे वारा घालूं. हा केळीच्या पानाचा वारा मला फारच उष्ण लागतो.

चेटी— बाई साहेब, ह्या वाऱ्याकडे काय दोष आहे बरें ?

गीति.

कोमलचंदनपल्लवरससंसर्गें सुशीत होऊन
निःश्वासांनींच[1] तुझ्या कदलीदलवात[2] होतसे ऊन[3].

नायिका— ( डोळ्यांत अश्रु आणून ) सखे, आहे काय गे ह्या संतापाच्या उपशमाचा कांहीं उपाय ?

---

१ श्वासोच्छ्वासांनीं. २ केळीच्या पानाचा वारा. ३ उष्ण.

चेटी. भट्टिदारिए, एस्थि सोज्जेव इहागच्छदि.

( ततःप्रविशतिनायकोविदूषकश्च )

नायकः आवृत्यैव सितासितेक्षणरुचा तानाश्रमे शाखिनः

कुर्वंत्या विटपावसक्तविलसत्कृष्णाजिनौघानिव,

यदृष्टोस्मि तया मुनेरपिपुर, स्तेनैव मय्याहते,

पुष्पेषो, भवता मुधैव किमिति क्षिप्यंत एते शराः १६

विदूष० भोवअस्स, कहिं खु गदं ते धीरत्तणं ?

नायकः वयस्य, ननुधीर एवास्मि; कुतः

नीताः किननिशाः शशांकधवला ? नाघ्रातमिंदीवरं ?

किन्नोन्मीलितमालतीसुरभयः सोढाः प्रदोषानिलाः ?

हुंकाराः कमलाकरे मधुलिहां किंवा मया नश्रुता ?

निर्व्याजं विधुरेष्वधीरइति मां केनाभिधत्ते भवान् ? १७

अथवा ननु सम्यगभिहितं वयस्येन.

स्त्रीन्हृदयेन नसोढाः क्षिप्ताः कुसुमेषवोप्यनंगेन,

येनाद्यैवपुरस्तव, वदामिधीरः कथं सोहं ?

**चेटी**— राजपुत्रि, आहे. तोच इकडे येत आहे.

( इतक्यांत नायक आणि विदूषक येतात. )

**नायक**— ( मदनास उद्देशून आपणाशीं बोलतो )

शार्दूलविक्रीडित वृत्त.

कृष्णश्वेत[1] अशा, तपोवनतरू जी पाहतां दृष्टिनें,
वाटे तद्विटपांवरी[2] पसरलीं आहेत कृष्णाजिनें[3],
तीनें देखियलें मला तइंच मी झालों हतप्राय[4] रे,
आतां हाणिसि बाण कां मज वृथा, तूं शंबरांच्या अरे[5],

**विदूषक**— मित्रा, तुझें धैर्य गेलें कुठें!

**नायक**— मित्रा, माझें धैर्य आहेच. कसें ह्मणशील तर.

शार्दूलविक्रीडित वृत्त.

नेल्या कां न निशा शशांक धवला? पद्मा न कां हुंगिलें?
झालों चंचल मालती सुरभितें किंवा प्रदोषानिलें?
भृंगांची कमलाकरीं[6] परिसली वाणी न का कोमला?
हेतूनें कवण्या अधीर ह्मणशी तें सांग मित्रा मला?
अथवा हें तूं बरोबर बोललास. कांतर.

गीति.

सुमशर अनंग मुक्त स्त्रीन्हृदया मज असह्य जरि घडती,
तरि धीर मी असें मग कसें वदावें सख्या तुझ्या पुढती?

---

१ काळ्या पांढऱ्या रंगाच्या दृष्टीनें. २ वृक्षांच्या शाखांवर. ३ मृगचर्में. ४ मृतप्राय. ५ शंबरशत्रो मदना. ६ तळ्यांत.

विदू० ( आत्मगतं ) एवं अधीरत्तणं पडिवज्जंतेण आविक्किदो णेन महंतो हिअअस्स आवेसो. ताजाव कधं जेव्व एदं अक्खिवामि ? ( प्रकाशं ) भोवअस्स, कीस उण अज्ज तुमं लहुज्जेव गुरुजणं सुस्सुसिअ इहागदो ?

नायकः वयस्य, स्थाने खलु भवतः प्रश्नः. कस्य वान्यस्य तत्कथनीयं ? अद्य खलु स्वप्ने जानामि सैवप्रियतमा ( अंगुल्या निर्दिश्य ) अत्र चंदनलतागृहे चंद्रमणिशिलाया मुपविष्टा प्रणयकुपिता किमपि मामुपालंभमानेव मया रुदती दृष्टा. तदिच्छामि स्वप्नानुभूतदयितासमागमे अस्मिन्नेव प्रदेशे दिवसमतिवाहयितुं. तदेहि गच्छावः.

विदू० एदु[३३] एदु भवं. ( परिक्रामतः )

चेटी. ( कर्णदत्वा ससंभ्रमं ) [३४]भट्टिदारिए, पडिसद्दो विअ सुणीअदि.

नायिका. ( ससंभ्रमं आत्मानं पश्यंती ) हंजे, [३५] मे इमं ईदिसं आआसं पेक्खिअ कोवि हिअअं कलइस्सदि. तां उट्ठेहि इमिणा रत्तासोअपाअवेण अंतरिदा पेक्खह्म को एसो.

( उभे तथा कुरुतः )

विदू० [३६]एदं तंचंदणलदाघरं ताएदं पविसह्म.

( नाट्येनप्रविशतः )

नायक ( वेलिक्कया: )

**विदू०** — ( मनांत ह्मणतो ) असा अधीरपणा मन्करून ह्यानें आपल्या ह्रदयांतील उद्वेग प्रगट केला. तर आतां ह्याचें चित्त दुसरे कडे कसें लावावें ( उघडपणें ) अरे मित्रा, आज तूं मातापित्यांची सेवा करून येथें लवकर कशा करितां आलास बरें ?

**नायक**— मित्रा, तूं प्रश्न केला तो बरोबर आहे. व मनांतली गोष्ट तरी तुजवांचून दुसऱ्या कोणाला सांगावी ? आज मी स्वप्नांत ती प्रिया ( बोटानें दाखवून ) ह्याच चंदनलतागृहांत चंद्रकांतशिलातलावर बसून प्रीतीच्या कोपानें माझी निंदा करीत रडत बसली आहे असें पाहिलें. यास्तव मी असें इच्छितों, कीं स्वप्नांत जेथें प्रियेचा समागम झाला त्या ह्या स्थळीं आजचा सारा दिवस घालवावा. तर चल आपण ह्या लतागृहांत जाऊन बसूं.

**विदू०**— बरें आहे. ये येतर. ( पुढें जातात. )

**चेटी** — ( कानोसा घेऊन घाबऱ्या घाबऱ्या म्ह० ) बाईसाहेब, कोणी आल्या सारखें वाटतें.

**नायिका**— ( घाबरून आपणाकडे पाहत म्ह० ) सखे, ही माझी अशी अवस्था पाहून कोणी माझ्या मनांतली गोष्ट ताडील. ह्यासाठीं ऊठ लवकर. आपण त्या तांबड्या अशोक वृक्षाच्या आड उभें राहून कोण येतो तो पाहूं.

( दोघी तसें करितात. )

**विदू०**— मित्रा, हेंच चंदनलतागृह. तर ह्यांत आपण प्रवेश करूं. ( आंत प्रवेश करितात. )

**नायक**— ( पाहून म्हणतो. )

चंदनलतागृहमिदं सचंद्रमणिशिलमपि प्रियं न मम,
चंद्राननया रहितं चंद्रिकया मुखमिव निशायाः. ५०

**चेटी.** ( दृष्ट्वा सहर्षं ) भट्टिदारिए,[३७] दिट्ठिआ वड्ढसे. सो ज्जेव्व दे एसो हिअअवल्लहो जणो.

**नायिका.** ( सहर्षं ससाध्वसंच )[३८] हंजे, एदं पेक्खिअ अदिसध्धसेण ण सक्कुणोमि इह अच्चासण्णे चिट्ठिदुं. कदावि एसो मं पेरखदि. ता एहि अण्णदो गछ्ह्म. ( सोत्कंपं पदं दत्वा ) हंजे, वेवदि एसो वामोरू.

**चेटी.** ( विहस्य )[३९] अइ कादरे, इह ठिदंपि तुमं कोपेक्खदि ? णं विसुमरिदो जेव्व दे एसो अगदो रत्तासोअपादवो ? ता इह जेव्व उववसीअ चिट्ठह्म.

( तथाकुरुतः )

**विदू॰** ( निरूप्य )[४०] भो वअस्स, एसा सा चंदणमणिशिला.

**नायकः** ( सबाष्पं निःश्वसिति )

**चेटी.**[४१] भट्टिदारिए, आलावो वि सुण्णीअदि. ता अवदहिअआओ सुणिह्म.

( उभेआकर्णयतः )

**विदू॰** ( हस्तेन तमाकर्षन् )[४२] भो वयस्य, ननु भणामि, साएषा चंद्रमणिशिला.

**नायकः.** वयस्य, सम्यगुपलक्षितं भवता ( हस्तेननिर्दिश्य )
शशिमणिशिला सेयं, यस्यां विपांडुरमाननं

गीति.

चंदनलतागृह मला चंद्रमणिशिलासमेतहिंसुखदन
चंद्रमुखीवांचुनिहें, ज्योत्स्नेवांचुनिजसेंनिशांवदन ॥

**चेटी**— ( पाहून हर्षानें म्ह० ) राजपुत्रि, तूं मोठी दैवाची! जो तुझ्या ऱ्हदयाचा आवडता जन, तोच हा आला.

**नायिका**— ( हर्ष पावून, आणि कांहीं भय पावून म्ह० सखे, ह्याला पाहून माझ्यानें इतक्याजवळ येथें उभें राहवत नाहीं. कदाचित् हा मला पाहील. तर येथून आपण दुसरी कडे जाऊं. ( भीत भीत दोन पावलें टाकिते. ) अगे माझी डावी मांडी कांपते.

**चेटी**— ( हांसून म्ह० )अगे भित्रे, तूं इथें असलीस तरी तुला कोण पाहतो ? तूं विसरलीस काय ? तुझ्या पुढल्या बाजूस हा तांबडा अशोक वृक्ष आहे हें ? तर आपण एथेंच बसून राहूं.

( तसें करतात. )

**विदू०**— ( पाहून ) मित्रा, चंद्रकांत शिला ती हीच.

**नायक**— ( डोळ्यांस पाणी आणून उसासा टाकतो. )

**चेटी**— बाई, संभाषणही ऐकूं येत आहे. तर आपण एकाग्र चित्तानें तें ऐकूं.

( दोघी कान देऊन ऐकतात. )

**विदू०**- ( हातानें त्याला ओढतो. ) अरे मित्रा, मी काय ह्मणतों ? अरे तीच ही चंद्रकांत शिला.

**नायक**— मित्रा, त्वां चांगलें जाणलें. ( हातानें दाखवून )

श्लोक

हरिणी वृत्त.

शशिमणिशिला तीही मित्रा बसून हिच्यावरी

---

१ चांदण्या वाचून. २ प्रदोष. ३ चंद्रकांत शिला.

करकिसलये कृत्वा वामे घनश्वसितोद्गमा,
चिरयति मयि व्यक्ताकूता, मनाक्स्फुरिताधरा,
नियमितमनोमन्यु, दृष्टा मया रुदती प्रिया. ६

तत्तस्यामेव चंद्रमणिशिलायामुपविशावः.

( उभौउपविशतः )

**नायिका.** ( विचिंत्य० ) [४३] हंजे, काउण एसा भविस्सदि ?

**चेटी.** [४४] भट्टिदारिए, जधाऽअम्हे अंतरिदाओ एणं पेक्खह्म. तधामण्णे तुमंपि एदेण दिट्ठा भविस्ससि.

**नायिका.** [४५] जुज्जइ; एव्वं कंउणपणअकुविदं पिअजणं हिअए कादुअ मंतेदि ?

**चेटी.** [४६] भट्टिदारिए, माईरिसं आसंक. पुणोवि दाव सुणेम्ह.

**विदू०** ( आत्मगतं ) [४७] अहिरमदि एसो एदाए कधाए; ता भोदु, एदंजेव्व वादइस्सं. ( प्रकाशं ) भोवअस्स, तदो सा रुदती तुएकिं भणिदा ?

**नायकः.** वयस्य, इदमुक्ता.

निष्यंदत इवानेन मुखचंद्रोदयेन ते,
एतद्बाष्पांबुनासिक्तं चंद्रकांतशिलातलं. ७

**नायिका.**- ( सरोषं ) [४८] चतुरिए, अत्थि किवि अदोवि अवरं सोदव्वं ? ( सास्रं ) ताएहि, गछह्म.

**चेटी.** ( हस्तेगृहीत्वा ) [४९] भट्टिदारिए, माएवं भण जेण तुमंदिट्ठा, सोअण्णं भणिस्सदित्ति णहि मे हिअअं पत्ताअदि ता कधावसाणं जेव्व पडिवालएह्म.

मुख धवल[1] निश्वासी[2] डाव्या करा वरतीं[3] धरी.
उशिर मजला झाला तेणें रुसूनचि राहिली.
रुदन करितां रात्रीं स्वप्नीं प्रिया निज[3] पाहिली.

तर त्याच चंद्रकांतशिलेवर आपण बसूं.

( दोघे तेथें जाऊन बसतात. )

**नायिका—** ( र्वितन करून ह्म० ) सखे ही कोण असेल बरें?

**चेटी—** अगे बाई, ती आपणच असाल. कांतर आपण जसें आड उभें राहून त्याला पाहत आहों तसें त्यानेंही आडून कधीं आपणाला पाहिलें असेल असें मला वाटतें.

**नायिका—** खरें पण प्रीतीच्या कोपानें रागावलेल्या कोणत्या प्रिय करणीला मनांत आणून तो सांप्रत बोलत आहे?

**चेटी—** बाई साहेब, अशी भलती शंका कां घेतां? थांबा, आपण ऐकूं पुढें ते काय बोलतात तें.

**विदू०—** ( मनांत ह्म० ) तिच्या गोष्टींनीं ह्याचें चित्त रमतें. असो. आतां ह्याजकडून तिजविषयींच कांहीं गोष्टी बोलवितों. ( उघड पणें ). बरें. मित्रा, ती रडतां पाहून तिच्याशीं तूं काय बोललास?

**नायक—** मी इतकेंच बोललों तिला.

गीति

भिजतें तेणें, तुझिया नेत्रा पासूनि बाष्प जें स्रवतें,
वाटे, चंद्रशिला तल, तव मुखचंद्रोदयेंचि हें द्रवतें.

**नायिका—** ( रागावून, ) चतुरिके, ह्याहून दुसरें आणखी ऐकावयाचें आहे काय? ( डोळ्यांस पाणी आणून ) तर चल आपण येथून जाऊं.

**चेटी—** ( तिचा हात धरून, ) बाई, असें ह्मणूंनका. अहो, ज्यानें तुह्माला पाहिलें तो दुसरें काय बरें बोलेल? तर आरंभलेली गोष्ट संपूंद्या.

---

१ पांडुरवर्ण. २ उस्वास टाकणारें. ३ माझी.

**नायकः.** वयस्य, जाने तामेवास्यां शिलाया मालिख्य, तया चित्रगतया सहात्मानं विनोदयामीति. तत्त्वरितमेव गिरितटान्मनःशिलाशकलान्यादायागच्छ.

**विदू॰** जं भवं आणवेदिति, (परिक्रम्योपसृत्यच) भो, तुए एक्कोवण्णओ आण्णाविदो, मए उण इह पव्वदे सुलहा पंचजाईआ वण्णआ आणीदा; ता आलिहदु भवं. (एवंवर्णकानुपनयति)

**नायकः.** वयस्य, साधु कृतं. (गृहीत्वा शिलायां तामालिखन् सरोमांचं) पश्य पश्य, तया चित्रगतया

अक्लिष्टबिंबशोभाधरस्य, नयनोत्सवस्य, शशिनइव,

दयितामुखस्य रेखा सुखयति नः प्रथमदृष्टेयं. ८

(इति लिखति)

**विदू॰** (सकौतुकं निर्वर्ण्य) भोवँअस्स, अपच्चक्खंपि णाम एवं लिहीअदि, अहो अच्चरिअं अच्चरिअं!

**नायकः.** (सस्मितं) किमात्राश्चर्यं?

प्रिया सन्निहितैवेयं संकल्पैः स्थापिता पुरा,

दृष्ट्वा दृष्ट्वा लिखाम्येनां यदितत्कोत्र विस्मयः? ९

**नायिका.** (सास्रं) चतुरिए जादं खु कहावसाणं; ताएहि, मित्तावसुं पेक्खह्म.

**नायक**— मित्रा, ती तर येथें नाहीं; परंतु ह्या शिळेवर तिचें चित्र काढून तिजकडे पाहून चित्तास करमणूक करावी असें मला वाटतें. ह्यासाठीं त्या गिरितटापासून मनःशिळेचा खडा लौकर घेऊन ये.

**विदू०**— जशी तुझी आज्ञा. ( जाऊन घेऊन येतो ) हे मित्रा, त्वां एकारंगाचा खडा आणं सांगितला, आणि मी तर ह्या पर्वतावर सहज मिळालेले पांचही रंगांचे खडे आणिले आहेत. हे घे. आणि चित्र लिही. ( असें म्हणून रंगांचे खडे नायकाजवळ ठेवितो. )

**नायक**— शाबास मित्रा, फार चांगलें केलें. ( खडे घेऊन शिळेवर तिचें चित्र लिहितांना सर्वांगावर कांटा उठल्यासारखें करून म्ह० ) मित्रा पहा पहा ?

गीति.

बिंब[1]प्रभाधरतशी, नयनोत्सवदायका, प्रथमबघतां
रेखा[2]प्रियामुखाची विधुच्यापरिरमवितेबहुतचित्तां.

(असें म्हणून पुढें लिहूं लागतो. )

**विदू०**— ( कौतुकानें निरखून पाहून म्ह० ) मित्रा, ती जवळ नसतां असें हुबेहूब तिचें चित्र काढिलें त्वां ! हें मोठेंच आश्चर्य !

**नायक**— ( किंचित् हास्य करून, ) ह्यांत आश्चर्य कशाचें ?

गीति

आहेप्रियासमीपचि, वासतिचायामदीयन्हृदयांत,
पाहुनिपाहुनितीतें,लिहितों आश्चर्यकायवदयांत ?

**नायिका**— ( डोळ्यांस पाणी आणून ) **चतुरिके**, झालें, गोष्टसंपली. चल आतां **मित्रावसू** कडे जाऊं.

---

१ ( चंद्रपक्षीं ) बिंबधारण करणारी; ( स्त्रीपक्षीं ) तोंडल्याचें तेज धारण करणारा आहे अधरोष्ठ जीचा. २. चंद्रपक्षीं ( कळा; ) स्त्रीपक्षीं रेषा, चित्र.

**चेटी.** ( सविषादमात्मगतं ) कहं जीविदणिरपेक्खो विअ से आलावो ! ( प्रकाशं ) भट्टिदारिए, णं गदा जेव्व तहिं मणोहारिआ दाव. कदावि भट्टा मित्तावसू इधज्जेव आअच्छदि.

( ततःप्रविशति **मित्रावसुः** )

**मित्रावसुः.** आज्ञापितो ऽस्मि तातेन, यथा वत्स मित्रावसो, कुमारजीमूतवाहनो ऽस्माभिरिहासन्नतरः परीक्षितःकृतोयोग्यो वरः; तदस्मै वत्सा मलयवती प्रतिपाद्यतामिति. अहंतु स्नेहपराधीनतया अन्यदेव किमप्यवस्थांतरमनुभवामि. यतः-

यद्विद्याधरराजवंशतिलकः, प्राज्ञः सतां संमतो,
रूपेणाप्रतिमः, पराक्रमधनो, विद्वान्विनीतो, युवा,
यश्चासूनपि संत्यजे त्करुणया सत्वार्थमभ्युद्यतः,
स्तेनास्मै ददतः स्वसार मतुला तुष्टिर्विषादश्चमे ?. १०

श्रुतं च मया सोजीमूतवाहनो त्रैव गौर्याश्रमसंबंधे चंदनलतागृहे वर्तत इति. तदेतच्चंदनलतागृहं तावत्प्रविशामि.

( इतिप्रविशति )

**विदू०** ( ससंभ्रममवलोक्य ) भोवअस्स, पच्छादेहि इमिणा कदलीवत्तेण. इमं चित्तांकिदरुवं एसो क्खु सिद्धयुवराजमित्तावसू इहागदो कदावि ण पेक्खेइ.

**नायकः.** कदलीपत्रेण चित्रमाछादयति. )

( प्रविश्य **मित्रावसुः** )

**मित्रावसुः.** भो कुमार, मित्रावसुः प्रणमति.

चेटी— ( खिन्न होऊन मनांत म्ह० ) हें काय ! जिवावर उदार झाल्या सारखें हिचें बोलणें दिसतें. ( उघड पणें म्ह० ) बाईसाहेब, थांबा अमळ. त्यांजकडे मनोहारिका मघांच गेली आहे. कदाचित् मित्रावसु इकडे येत असेल.

( इतक्यांत मित्रावसु येतो. )

मित्रावसु— मला तातानें आज्ञा केली आहे कीं वत्सा मित्रावसो, कुमार जीमूतवाहन येथें जवळ आहे, त्याची आम्हीं परीक्षा केली; तो तुझ्या भगिनीला वर योग्य आहे; ह्या साठीं कन्या मलयवती त्याला द्यावी म्हणोन, परंतु भगिनीच्या स्नेहामुळें माझ्या मनांत दुसरेंच कांहीं येतें. कांकीं,

शार्दूलविक्रीडीत.

जोविद्याधरवंशभूषण, कवि, ज्ञात्यांसजोसंमत,
रूपेंमन्मथसा, पराक्रमपटू, विद्वान्, युवा, मोद्यत,
सत्वांचें हितव्हावया त्यजिलजो स्वमाणकिंवामही,
देतांत्यास बहीण होय मजला संतोषही खेरही.

असो. मी ऐकिलें आहे कीं जीमूतवाहन ह्याच ठिकाणीं गौर्याश्रमाच्या चंदनलतागृहांत आला आहे. ह्यासाठीं चंदनलतागृहांतच जावें म्हणजे त्याची भेट होईल.

( असें म्हणून चंदनलतागृहांत जातो. )

विदूषक— ( गडबडीनें अवलोकन करून म्ह० ) मित्रा मित्रा, हें चित्र केळीच्या पानानें झांक. युवराज मित्रावसु इकडे येत आहे. तो कदाचित् हें पाहील.

नायक— ( केळीच्या पानानें चित्र झांकतो. )

( मित्रावसु जवळ जातो )

मित्राव०— अहो कुमार, मी मित्रावसु प्रणाम करितों.

**नायकः.** ( दृष्ट्वा ) मित्रावसो, स्वागतमिहोपविश्यतां.

**चेटी.** भट्टिदारिए, आगतो मित्रावसुः.

**नायिका.** हंजे, पिअं पिअंमे.

**नायकः.** मित्रावसो अपि कुशली सिद्धराजो विश्वावसुः ?

**मित्रावसुः.** कुशली तातस्तदादेशेनास्मि त्वत्सकाशमागतः.

**नायकः.** किमाह तत्र भवान् ?

**नायिका.** ( स्वगतं ) सुणिस्सं किंतादेण संदिट्ठं.

**मित्रावसुः.** इदमाह तातः. अस्तिमे दुहिता मलयवतीनाम, जीवितमिवास्य सर्वस्यापि सिद्धराजान्वयस्य. सा मया तुभ्यं प्रदत्तेति तदियं प्रतिगृह्यतामिति.

**चेटी.** ( विहस्य सहर्षं ) भट्टिदारिए, किंण कुप्पसि दाणिं ?

**नायिका.** ( सस्मितं सलज्जंचाधोमुखी स्थित्वा ) हंजे, मारुस, किं विसुमरिदं एअस्स अण्णहिअअत्तणं ?

**नायकः.** ( अपवार्य विहस्य ) संकटे पतिताः.

**विदू॰** भो जाणामि, ण तां वज्जिअ अण्णस्सिं चित्तं दे अहिरमदि. ता जधा तधावि जंकिपि भणिअ विसज्जीअदु एसो.

**नायिका.** ( सरोषमात्मगतं ) हदास, कोबा एदं ण जाणेदि ?

**नायकः.** मित्रावसो, कइव नेच्छति भवद्भिःसह श्लाघ्यमीदृशं संबंधं ? किंतु नशक्यते चित्तमन्यतः प्रवर्तयितुं अ-

**नायक**— ( त्याजकडे पाहून ) कोण **मित्रावसु**, **मित्रावसो**, तुझें स्वागत असो. येथें बसावें.

**चेटी**— बाई; आपले बंधू आले.

**नायिका**— अगे, फार चांगलें झालें. वाहवा.

**नायक**— **मित्रावसो**, सिद्धराज **विश्वावसु** कुशल आहेत कीं ?

**मित्राव०**— अति खुशाल आहे. त्याच्याच आज्ञेनें मी तुम्हांकडे आलों आहें.

**नायक**— त्यांनीं काय आज्ञा केली आहे ?

**नायिका**— ( मनांत ) ऐकतें आतां, ताताने काय सांगून पाठविलें आहे तें.

**मित्रावसु**— त्यांनीं असें सांगितलें आहे कीं, सिद्धराज कुळाची केवळ जीवमाण, अशी माझी **मलयवती** नामक कन्या, ती मी तुम्हांस दिली. हिचा आपण अंगीकार करावा !

**चेटी**— ( हर्षपावून व हांसून म्ह० ) बाई आतां कां आपण रागावत नाहीं.

**नायिका**— ( किंचित् हांसून आणि लज्जेनें खालीं तोंड करून म्ह० ) सखे, रागें भरूनको. त्याचें दुसऱ्याप्रियस्त्री वर चित्त गुंतलेलें नुकतेंच आपल्या दृष्टीस पडलें. तें तूं इतक्यांत विसरलीस काय?

**नायक**— ( एकीकडे तोंड करून हांसून ह्म० ) हें मोठेंच संकट प्राप्त झालें!

**विदू०**— मित्रा, मी समजलों. तिला सोडून दुसरे ठिकाणीं तुझें चित्त रमणार नाहीं तें. तर आतां जसें तसें कांहीं तरी बोलून ह्याला येथून घालीव ह्मणजे झालें.

**नायिका**— ( रोषानें मनांत ह्म० ) मेल्या, हें तुझें कपट कोण जाणत नाहीं ?

**नायक**— **मित्रावसो**, तुम्हांशीं असा श्लाघ्य संबंध कोणाला आवडणार नाहीं ? परंतु एकीकडचें चित्त काढून

तो नाहमेनां प्रतिग्रहीतु मुत्सहे.

नाय० ( मूर्छां नाट्यति )

चेटी. समस्ससिदु[62] समस्ससिदु भट्टिदारिआ.

विदू० भो, परोधीणो[63] खुएसो. किं ऐदेण अणुणीदेण ?

गुरुअणं से गदुअ अभ्भत्थेहि.

मित्रावसु:. ( स्वगतं ) साधूक्तमनेन. नायं गुरुवचन मति क्रामति. अस्य गुरुरपि अस्मिन्नेव गौर्याश्रमे प्रतिवसति. तद्यावद्गत्वास्य पित्रोर्मलयवतींप्रतिपादयामि.

नायिका. ( समाश्वसिति )

मित्रावसु:. ( प्रकाशं ) एवं निवेदितात्मनोस्मान्प्रत्याचक्षाणः कुमार एवाति बहुतरं जानाति.

नायिका:. ( सरोषंविहस्य ) कहं[64] पच्चक्खं लहुकिदो मित्रावसु पुणोवि किंपि मेतेदि.

( मित्रावसुर्निष्क्रांत: )

नायिका. ( सास्रमात्मानंपश्यंती ) किंमह[65] एदिणा दोहग्गकलंकमिलिदेण अच्चंतदु:खभाइणा अज्जवि सरीरकेण धारिदेण ? ताइहज्जेव असोअपादवे इमाए अतिमुत्तलदाए उव्वंधिअ अप्पाणं वावादइस्सं. ताएव्वं दाव. ( प्रकाशं. विलक्षस्मितेन ) हंजे, णं पेक्ख दाव मित्तावसू दूरंगदोणवेति. ताजेण अहंवि इदो गमिस्सं.

चेटी. कतिचित्पदानि गत्वा ( स्वगतं ) अण्णारिसं से हिअअं पेक्खामि णदावअग्गे गमिस्सं. इहज्जेव्व अवसरिदा पेक्खामि किं एसापडिवज्जदिति.

दुसरीकडे लावण्यास मी समर्थ नाहीं. ह्या साठीं तूं म्हणतोस ही गोष्ट माझ्यानें मान्य करवत नाहीं.

नायिका— ( ऐकून मूर्च्छा आल्यासारखें करते. )

चेटी— बाई, सावध व्हा, सावध व्हा, धीर धर.

विदू०— हे युवराज मित्रावसो, हा केवळ पराधीन आहे. ह्याची प्रार्थना करून काय फळ ? ह्याच्या पित्याकडे जाऊन त्याची प्रार्थना करावी.

मित्राव०— ( मनांत म्ह० ) हा खरें बोलतो. हा पित्याचें वचन मोडणार नाहीं. ह्याचा पिताही येथें जवळच गौर्याश्रमांत राहत आहे. तर त्याकडे जाऊन मलयवती त्यांच्या स्वाधीन करावी.

नायिका— ( सावध होते )

मित्राव०— ( उघडपणें म्ह० ) आम्हीं आपलें मनोगत तुम्हांस सांगितलें असतां तुम्हीं आम्हांस झिडकारिलें. असो, ह्यावरून तुम्ही मोठे जाणते आहां असें दिसतें.

नायिका— ( रागानें हांसून म्ह० ) हा मित्रावसु प्रत्यक्ष झिडकारिला असतां कशाला फिरून बोलावयास जातो ? ( मित्रावसु निघून जातो. )

नायिका— ( डोळ्यांस पाणी आणून आपणाकडे पाहून म्ह० ) ज्याला अपमानाचा डाग लागला, असें हें दुःख भोगणारें शरीर ठेवून काय फळ ? तर येथेंच ह्या अशोक वृक्षाला खालीं आलेल्या अतिमुक्त नामक वेलीनें गळफास लावून घेऊन जीव द्यावा हें बरें. पण अगोदर असें केलें पाहिजे. ( उघडपणें विस्मय केल्या सारखें करून म्ह० ) अगे चतुरिके, पहा पहा बरें मित्रावसु दूर गेला कीं काय तें. तो गेला असला तर मीही येथून जाईन.

चेटी— बरें आहे. ( असें ह्मणून कांहीं पुढें जाऊन मनांत म्ह० ) हिचा बेत कांहीं वेगळ्या प्रकारचा दिसतो. ह्या साठीं पुढें जातां नये. येथेंच एकीकडे उभें राहून पहावें बरें ही काय करतेतें. ( असें ह्मणून आड उभी राहून पाहते. )

नायिका ( दिशोविलोक्य पाशं पाणौ गृहीत्वा सास्रं ) भअँव दि गोरि, जइ तुए इह जम्मे मे णकिदो पसाओ, ताअण्णस्सि पि जम्मंतरे जधा ण इदिसी दुःखभाइणी होमि तधाकरेहि ( कंठपाशमर्पयति )

चेटी. ( दृष्ट्वा ससंभ्रमं ) परित्तोअध परित्ताअध. एसा भट्टि दारिआ उब्बंधिअ अप्याणं वावादेदि.

नायकः. ( ससंभ्रममुपेत्य ) क्वासौ, क्वासौ. ?

चेटी. पेक्ख पेक्ख, असोअपाअवे।

नायकः. ( सहर्षं ) कथं सैवेयमस्मन्मनोरथभूमिः।

( पाणौ गहीत्वा लतापाशमाक्षिपति

नखलु नखलु, मुग्धे, साहसं कार्यमेतत्,

व्यपनय करेमनं पल्लवाभं लतायाः,

कुसुम मपिविचेतुं यो नमन्ये समर्थः,

कलयति सकथं ते पाशमुद्बन्धनाय ? ११

नायिका ( ससाध्वसं ) हंजे, कोउणएसो ?) सम्यङ्निरूप्य, सरोषं हस्तमाक्षिपति.) अये, मुंच मुंच अग्गहत्थं. को तु मं णिवारिदु मागदो? कधं मरणेवि तुमं अब्भत्थणीओ।

नायकः--

कंठे हारलतायोग्ये येन पाशस्तवार्पितः,

नायिका—( चोहोंकडे पाहून हातांत वेलीचा फांस घेऊन डोळ्यांस पाणी आणून म्ह०) हे भगवती गौरी ह्या जन्मांत तर त्वां मजवर प्रसाद केला नाहीं. पण पुढें जन्मांतरीं तरी मी अशी दुःखे भोगणारी न होईन असें कर. ( असें म्हणून गळ्याभोंवता फांस गुंडाळते. )

चेटी—( पाहून घाबरते. ) अहो धांवाधांवा. रक्षण करा, रक्षण करा, पहा ही राजकन्या गळ्याला फांस लावून जीव देत आहे. !

नायक—( गडबडीनें पुढें येऊन ) कोठें आहे कोठें आहे ती ?

चेटी— पहा पहा ती अशोक वृक्षाला—

नायक—( हर्षपावून ) अहो हीच माझ्या मनोरथाची जागा ! ( जवळ जाऊन तिचा हात धरून वेलीचा फांस ओढून घेतो. ).

साक्या.

नकोनको, हें साहस ऐसें काय मांडिलें, वेडे
लता पाश सोडुनि करपल्लव करगे ह्या एकिकडे.
कुसुमहि तोडावया लतेचें ज्याहस्तें न शकावें,
कंठबंधना काय लतेला त्याहस्तें हिसकावें.

नायिका—( पाहून भयभीत होते ) अगे, हा कोण आला ? ( पुरतें निरखून पाहून रागानें हात हिसकावते ) अरे सोडसोड माझा हात. माझें निवारण करण्यास तूं कोण आलास ? मरण्याविषयीं देखील तुझें आर्जव केलें पाहिजे काय ?

नायक— मी हात सोडणार नाहीं,

गीति.

हारास योग्य जो त्या कंठीं ज्यानें समर्पिला फांस,

गृहीतः सापराधोयं सकथं मुच्यते करः ॥ १२.

विदू० ( चेटीमुपसृत्य ) [७०]भोभोदि, किं उणसे इमस्स मरण
ववसाअस्स कारणं ॥

चेटी. णं[७१]एसो ज्जेव्व पिअवअस्सो दे कारणं.

नायकः. कथमहमेवास्या मरणव्यवसायकारणं ॥ तदेतन्न खल्वह मवगच्छामि.

विदू० [७३]भोदि, कहंविअ

चेटी. ( साकूतं ) जं[७४] सादेपिअवअस्सेण कावि हिअअवल्लहा
शिलादले आलिहिदा, ताए पक्खवादिणा एदेण पडि
वादअंतस्सवि मित्तावसुणो णाहं पडिग्गहीदा, त-
दो जावण्णिव्विण्णाए एदं ववसिदं.

नायकः. ( सहर्षमात्मगतं ) कथमियमेवासौ विश्वावसो
र्दुहिता मलयवती ॥ अथवा रत्नाकरादृतेकुतश्चंद्रलेखायाः
प्रसूतिः हा कथं वंचितोस्मि अनया. ॥

विदू० भोदि[७५], जई एव्वंता अणवरद्धो पिअवअस्सो. एसा
खु आलिहिदा. अह वा जदि ण पत्तीअसि, तदो सअं ज्जे
व गदुअ शिलादले पेक्खदु भोदी.

नायिका. ( सहर्षं सलज्जंच नायकं पश्यंती हस्तमाकर्षति )

नायकः. ( सस्मितं ) नतावन्मुंचामि, यावन्मयाहृदयवल्लभां
शिलायामालिखितां नपश्यसि.

( सर्वे चंद्रनलतागृहंप्रविशंति )

नायिका. ( निरूप्य अपवार्यंच सस्मितं )

तो अपराधी कर हा धरिला, सोडीन काय मी त्यास.

विदू०— ( चेटीच्या जवळ जाऊन म्ह० ) कायगे, ही मुलगी जीव देते, ह्याचें कारण काय ?

चेटी— बावा, तुझा जो हा प्रिय मित्र तोच कारण ?

नायक— काय हिंच्या मरणाच्या निश्चयास मीच कारण ? मीतर हें कांहींच जाणत नाहीं.

विदू०— बरें कसें तें सांग.

चेटी— सांगतें ऐक. ह्या तुझ्या प्रिय मित्रानें आपली जी कोणी ऱ्हदयवल्लभा मघां शिलातलावर लिहिली, तिचा अभिमान धरून, मित्रावसूनें ही माझी प्रिय सखी त्याला दिली असतां, ही स्वीकारली नाहीं. त्या अपमानदुःखामुळें हिनें जीव देण्याचा निश्चय केला.

नायक— ( हर्षपावून मनांत म्ह० ) काय हीच का ती विश्वावसूची कन्या मलयवती ? योग्य योग्य ! ठीकच आहे. रत्नाकरावांचून[१] चंद्रकलेची उत्पत्ति कशी होईल ? काय आज हातांतले रत्न गमावत होतों ?

विदू०— अगे असें आहे तर माझ्या मित्राकडे कांहींच अपराध नाहीं. ही तुझी प्रियसखीच येथें लिहिली आहे. तुला खोटें वाटत असेल तर तूं स्वतां जाऊन पहा, त्या शिलातलावर कोण लिहिली आहे ती.

नायिका— ( हर्षित व लज्जित होऊन नायकाकडे पाहत होत्साती आपला हात ओढिते. )

नायक— ( किंचित् हास्य करून ) मी शिलातलावर लिहिलेली माझी ऱ्हदयवल्लभा तूं पाहीस तोंपर्यंत मी तुझा हात सोडणार नाहीं.

( सर्व चंदन लतागृहांत प्रवेश करतात. )

नायिका— ( शिलातलाकडे पाहून एकीकडे वळून हांसत

---

१ समुद्र

चँतुरिए अहंविअ आलिहिदा !

चेटी. ( चित्राकृतिं नायिकांचनिर्वर्ण्य ) भँट्टिदारिए, किंभ-णासि अहंविअ आलिहिदेति. ईदिसं सेसारिछं, जेणणजाणीअदि किंदावमणिसिलाए भट्टिदारिआए पडिबिंबं संकंतं आहोतुमं आलिहिदेत्ति.

नायिका. ( विहस्य ) दुँज्जणी किदह्मि इमिणामं चित्तगदंसअत्तेण.

विदू० भो भो, णिवुत्तोदाणिं ते गंधव्वो विवाहो. विमुंच दाणिं अग्गहत्थं. एसाखु काविचदुरिआ इदो ज्जेव आअछदि.

नायकः ( ईषत्स्मितं कृत्वानायिकांमुंचति )

( ततःप्रविशति चेटी )

चेटी. ( सहर्षं सहसोपसृत्य ) भँट्टिदारिए, दिठ्ठिआ वढ्ढसि. पडिच्छिदा तुमं भट्टिणो जीमूतवाहणस्स गुरुईंहिं.

विदू०. ( नृत्यति ) पुँण्णा मनोरहा पिअवअस्सस्स, अहवा णहि णहि; भोदीए मलअवदीए एव्व,अहवा ण एदाणं; (आत्मानंदर्शयन् ) णंमहज्जेव एकस्स बह्मणस्स.

चेटी. आँणत्तंहि जुवराअ मित्तावसुणा, जधा अज्ज ज्जेव मलअवदीए विवाहूस्सवस्स मंगलं संवत्तं भविस्सदित्ति. तांलहुंगेण्हिअ आअछ. ताएहि गछम्ह.

हांसत चेटीस म्ह० ) कायगे चतुरिके येथें माझ्या सारखेंच चित्र दिसतें, नाहीं बरें ?

**चेटी**— ( चित्राकडे आणि नायिकेकडे वारंवार निरखून पाहून. ) बाईसाहेब, माझ्या सारखें असें कां म्हणतां माझेंच म्हणाना ? आपलें आणि चित्राचें इतकें सादृश्य आहे कीं ह्या चंद्रकांतशिळातलावर तुमचें प्रतिबिंब पडलें आहे किंवा चित्र लिहिलें आहे हा मला कांहींच निश्चय होत नाहीं.

**नायिका**— ( हांसून ) माझें चित्र काढलेलें मला दाखवून ह्यानें मला फजित केलें.

**विदू०**— हे प्रिय मित्रा, झालें काम ! हिच्याशीं तुझा गंधर्वविवाह झाला. आतां सोड तिचा हात, ती पहा तिकडून कोणी दासी इकडे येत आहे.

**नायक**— ( किंचित् हास्य करून नायिकेला सोडतो. )

( इतक्यांत दुसरीचेटी येते. )

**चेटी**— ( हर्ष पावून ) बाईसाहेब, आपण मोठ्या दैवाच्या ! पूज्य व पुरुषश्रेष्ठ जो **जीमूतवाहन** त्याच्या पित्यानें सून करण्यासाठीं आपला स्वीकार केला.

**विदू०**— ( नाचतो ) वाहवा ! माझ्या प्रियमित्राचे मनोरथ पूर्ण झाले. नाहींनाहीं. त्याचे नाहींत. गे **मलयवती** तुझे मनोरथ पूर्ण झाले. अथवा तुम्हा दोघांचेही नाहींत. ( आपल्या उराला हातलावून ) तर मज एकट्या ब्राह्मणाचे मनोरथ पूर्ण झाले. आतां मला लाडू आणि मोदक चंगळ.

**चेटी**— युवराज **मित्रावसु** ह्यानें मला आज्ञा केली आहे कीं, आजच **मलयवती**च्या विवाहाचा मंगल समारंभ होणार आहे ह्यासाठीं लवकर जाऊन तिला घेऊन ये. तर बाई साहेब, चलावें तिकडे जाऊं.

विदू० ओःगदासि दासीए धीए एदं गेण्हिअ ! वअस्सेण किं इधज्जेव अत्थिदव्वं ?

चेटी. ( विहस्य ) हंहो, मातुवर. तुम्हाणं वि ण्हावणकं आअदं ज्जेव.

नायिका. ( सानुरागं सलज्जं च नायकं पश्यंती सपरिवारा निष्क्रांता )

( नेपथ्ये वैतालिकाः पठंति )

चूर्णैः पिष्टातकस्य द्युतिमिह मलये मेरुतुल्यां दधानैः,
सद्यः सिंदूरधूलीकृतदिवसमुखारंभसंध्यातपश्रीः,
गीतैः सिद्धांगनानां सममनुरणयन् नूपुरारावरम्यैः,
उद्गाहस्नानवेलां कथयति भवतः सिद्धये सिद्धलोकः. १२

विदू०( समाकर्ण्य ) दिट्ठिआ, भो वअस्स, आअदं ण्हावणकं !

नायकः सखे, यद्येवं तत्किमिदानीमिह स्थितेन ? तदागच्छ. आवामपि तातं नमस्कृत्य स्नानभूमिमेव गच्छावः.

अन्योन्यप्रीतिकृतः समानरूपानुरागकुलवयसां
केषांचिदेव, मन्ये, समागमो भवति पुण्यवतां १३

( इति निष्क्रांताः सर्वे )

द्वितीयोंकः समाप्तः

विदू०— अगे रांडलेंकी, तूं तिला घेऊन चाललीस. आतां माझ्या प्रियमित्रानें येथेंच हाका मारीत बसावें काय ?

चेटी— ( हास्य करून ) अरे भटुरग्या, अशी उतावळी करूंनको. तुमच्या न्हाण्याचेंही साहित्य तुम्हांकडे आलें म्हणा.

नायिका— ( भीतीनें आणि लज्जेनें नायकाकडे पहात पहात सपरिवार निघून जाते. ) ( इतक्यांत पडद्यापलीकडे स्तुतिपाठक बोलतात. )

ओंव्या.

अबीरबुकाउधळिती, तेणेंपिंवळेरंगदिसती,
सुवर्णपर्वताचीशोभाधरिती, मळयपर्वतीं १
मुठीभरभरोनिसिंदूरधूळी, फेंकूनिदेतीअंतराळीं,
तेणेंसंध्यारागदिग्मंडळी, सुरंजितदिसतसे २
गायनकरितीसिद्धांगना, नूपुरेंवाजतीखणखणा,
त्यांच्याअनुलक्षेंकरूनिनाना स्वरकाढितीआपण ३
ऐशियासिद्धांचामेळा, मंडपामाजीमांडूनिखेळा,
सुचवीमंगळस्नानवेळा, तवअभ्युदयाकारणें ४

विदू०— ( ऐकून ) काय सुदैव हें ! खरेंच न्हाण्याचें साहित्य आलें.

नायक— मित्रा, असें जर आहे तर आपण येथें कशाला बसावें ? चल आपण पित्याच्या पायांस नमस्कार करून स्नानभूमीकडेसच जाऊं.

गीति.

अनुरागरूपकुलवयतुल्य प्रेमाहिएकमेकांचा
लोकीं समागमघडे, विरळा ऐशा सुपुण्यवंतांचा.

( सर्व निघून जातात. )

दुसराअंकसमाप्त.

अंक. २



( ततः प्रविशति मत्तो, विचित्रोज्ज्वलवेषश्च हस्तस्कंधारोपित सुराभांडो विटश्चेटश्च )

विटः. ( सहर्ष. )

णिच्चंजोपिवइसुरं, जणस्सपिअसंगमंचजोकुणइ,
मण्णेदोविअदेवा, बलदेवो, कामदेवोअ १

( घूर्णमानः ) सहेलं महसेहरअस्स जीविदं.

वक्खत्थलम्मिदईआ, णीलुप्पलवासिआमुहेमइरा,
सीसम्मिअसेहरओ, णिच्चंचिअसंटिदोजस्स २

# अंक १

## पात्रें.

विट. ............... शेखरक नांवाचा दास.
चेट. ............... त्याचा सोबती.
विदूषक. ............... नायकाचा मित्र.
चेटी. ............... नवमालिका, विटाचीस्त्री.
नायक. ............... जीमूतवाहन.
नायिका. ............... मलयवती.
मित्रावसु. ............... मलयवतीचा भाऊ.

प्रारंभ.

( तदनंतर विचित्र आणि उज्वलवेष करून व खांद्यावर दारूचें भांडें घेऊन उन्मत्त झालेला विट आणि चेट येतात. )

**विट—** ( हर्षानें म्हणतो. )

गीति.

जो पी नित्यसुरेला, भेटवितो नित्यजो प्रियजनाला,
देव असे हे दोघे दिसती बलदेव[3] कामदेव[4] मला १
( अमलानें गुंगल्या सारखा होऊन म्ह० )
मज शेखरकाचें जीवित सफल झालें. कांकीं,

गीति.

वक्षःस्थानीं दयिता, नीलोत्पलवासिता मुखींमदिरा,
ज्याच्यानित्यफुलांचा माथ्यावर लाविलाअसेचतुरा २

---

३ बळराम. ४ मदन. बळराम मद्यपितो आणि मदन स्त्रीपुरुषांची भेट करवितो.

परिस्खलन्सहासं: णो मालिआ मंपरिहसेई. अरे कोमं परिवारेई.

चेट: भट्टक, ण दाव अज्जवि आअच्छदि णोमालिआ.

विट: ( सरोषं. ) पढमप्पदोसे ज्जेव मलअवदीए विवाहमंगलं संवुत्तं. ता कीस सादाणिं फ्हदेवि ण आअच्छदि ( सहर्षं. ) अहवा अज्ज इमस्सि मलअवदीविवाहमंगलमहूसवे सव्वो ज्जेव णिअपणइणीजणसणाहो सिद्धविज्जाहरलोओ कुसुमाकरुज्जाणे आवाणअसुहमणुभविस्सदित्ति तक्केमि. तहिंज्जेव णोमालिआ मं आवेक्खमाणा चिट्ठिदि. ता अहंपि तहिंजेव गमिस्सं. कीदिसो णोमालिआए विणा सेहरओ ( स्खलन् परिक्रामति. )

चेट: एदंतं खुउज्जाणं, पविसदु भट्टारआ.

( उभौ प्रविशत: )

( तत: प्रविशति स्कंधन्यस्तवस्त्रयुगुलो विदूषक: )

विदू० सुदं मए, अज्ज पिअवअस्सो कुसुमाकरुज्जाणं गमिस्सदित्ति ता जाव तहिं ज्जेव गमिस्सं. ( परिक्रम्य विलोक्य च ) एदं कुसुमाकरुज्जाणं, ता पविसामि ( प्रविश्य भ्रमरसंपातं नाट्यति ) अरे, कीस उण एदे मुहुअरा दुट्ठामं परिहवंदि ? ( आघ्मानमाघ्राय. ) भोदु, जाणिदं, तं जं मलअवदीए बंधु जणेण जामादुअस्स पिअवअस्सोसि किण्णि

( अडखळत अडखळत हांसून म्ह० )

**नवमालिका.** मला हांसेल. अरे कोण आहे रे माझ्यामागें?

**चेट—** धनी साहेब, अजून **नवमालिका** आलीच नाहीं. मग ती हंसेल कोठून ?

**विट—** ( क्रोधानें ) काय **मलयवतीच्या** लग्नाचा मंगल समारंभ तर काल संध्याकाळींच झाला. मग कशा साठीं ती फटफटीत उजाडलें तरी अजून आली नाहीं ? ( हर्षपावून आपणाशीं ) अथवा आज त्या विवाह समारंभामध्यें सर्व सिद्ध विद्याधर लोक आपापल्या बायका बरोबर घेऊन कुसुमाकर बागेंत [१]पानसुखाचा अनुभव घेतअसतील, असें वाटतें. तर मला पहावयासाठीं **नवमालिका** तेथें उभी राहिली असेल ह्यासाठीं आपणही तिकडेसच जावें. **नवमालिकेवांचून** हा **शेखरक**[२] शोभत नाहीं. ( अडखळत अडखळत पुढें जातो. )

**चेट—** धनीसाहेब; हीच कुसुमाकर बाग, हींत आपण प्रवेश करावा. ( दोघेप्रवेश करतात. )

( इतक्यांत खांद्यावर दोनवस्त्रें घेऊन विदूषक येतो. )

**विदू०—** म्यां ऐकिलें आहे कीं, माझा प्रियमित्र कुसुमाकर बागेंत जाणार आहे. तर मीहि तिकडेसच जातों. ( पुढें जाऊन पाहून म्ह० ) हीच कुसुमाकर बाग. हींत जावें. ( असें म्हणून बागेंत प्रवेश करतो आणि भ्रमरांनीं आंगावर बसून त्रासविल्या सारखें दाखवितो. ) अरे, हे दुष्ट भृंगे वारंवार मला कां त्रास देतात ? ( आपल्या आंगाचा वास घेऊन म्ह० ) हां समजलों मीं. **मलयवती** च्या बंधुजनांनीं मी जांवईबावाचा प्रिय मित्र म्हणून ब-

---

१ सुरापान. २ शेखरक म्हणजे तुरा माळे वांचून शोभत नाहीं हें प्रसिद्ध आहे.

सबहुमाणं सुगंधवण्णकेहिं विलित्तोम्हि; संताणअसे हरंअ मे पिणद्धं; सोक्खु एसो अच्चाअरो अणत्थीभूदो. ताकिदाणिं एत्थ करिस्सं? अहवा देण ज्जेव मलअवदीए सआसादो लध्धेण रत्तंसुअजुगलेण इत्थिआविअ लंबलंबं परिहाअ, इअरेण उत्तरीएण किदावगुंठणो गमिस्सं. पेक्खामि दाव किंमे दासी पुत्ता दुठ महुअरा करिस्संति

( तथाकरोति. )

विटः ( निरूप्य सहर्षं ) अरेचेट, ( अंगुल्यानिर्दिशन् सहासं ) एँसा खु णोमालिआ मंपेक्खिअ अहं चिरसमागदोत्ति कदुअकुविदा अवगुंठणंकरिअ अण्णदो गच्छदि. ता कंठे गेण्हिअ. पसादम्मिणं ( सहसोपसृत्य विदूषकं कंठे गृहीत्वा मुखेन तांबूलं दातुमिच्छति. )

विदू०. ( मद्यगंधेन सूचयन् ) दूरं, रे, दूरमिति. ( नासिकांपिधाय परावृत्य स्थितः ) कहं एक्कणं दुठमुहुअराणं सआसादो कहंविअ परिब्भट्ठो दाणिंअण्णस्स दुठमुहुअरस्स मुहे पडिदोम्मि !

विटः. कहं कोवेण परम्मुही भूदा ! भोदु, पायसुपडिअ पसादेम्मि. ( प्रणामंकुर्वन् विदूषकस्य चरणावात्मनः शिरसिकु-

हुमानास्तव माझ्या आंगाला केशर कस्तूरी इत्यादिक सुगंधि द्रव्यें फांसलीं आहेत. आणि पागोट्यांत सुगंधि फुलांचा तुरा खोंविला आहे. त्या वासामुळें हे रांडलेक भुंगे माझ्या आंगाला लगटतात. हा त्यांचा अत्यादर मला अनर्थास कारण झाला ! आतां येथें कोणता उपाय करावा ? अथवा असें करावें. **मलयवती** पासून मला दोन वस्त्रें मिळालीं आहेत, त्यांतून एक बायकां सारखें पायघोळ नेसावें आणि एकाचा डोईवरून बुरखा घेऊन जावें. मग पाहीन बरें, हे रांडलेक भुंगें मला काय करितात तें. ( असें म्हणून एक वस्त्र नेसतो आणि एक डोकीवरून पांघरतो. )

विट— ( त्याकडे पाहून हर्षानें म्ह० ) अरे चेटा, ( बोटानें दाखवून हांसून म्ह० ) ही पहा **नवमालिका** आली. मला उशीर लागला, म्हणून मला पाहून रागानें बुरखा घेऊन दुसरीकडे चालली आहे. तर तिच्या गळ्याला मिठी घालून तिचें सांत्वन करितों. ( असें म्हणून लवकर जवळ जाऊन विदूषकाच्या गळ्याला मिठी घालून तोंडाजवळ तोंड नेऊन आपल्या तोंडांतला विडा स्त्रीभ्रांतीनें त्याला द्यावयास लागतो. )

विदू०— ( मद्याचा गंध आला असें दाखवून ) दूर होरे, दूरहो, कोण आहेस तूं ? ( नाक दाबून धरतो आणि पाठ मोहरा. होऊन उभा राहतो. ) त्या दुष्ट मधुपांच्या हातून मी कसा तरी एकदांचा सुटलों होतों तों ह्या दुसऱ्या मधुपाच्या[१] हातीं सांपडलों

विट— काय ! ही कोपानें तोंड मुरडते ! मजकडे पाहत नाहीं ! असो. पायांपडून तिला प्रसन्न करीन. ( असें म्हणून वि-

---

१ मधुप हा शब्द भ्रमर आणि मद्यपी ह्या दोघांकडे लागतो.

त्वा ) पसीद णोमालिए पसीद.

( ततः प्रविशति चेटी. )

चेटी. आणंतम्हि भट्टिदारिआए मलअवदीए जणणीए, हंजे णोमालिए, कुसुमाकरुज्जाणंगछिअ उज्जाणवालिअं पल्लविअं भणाहि; अज्ज सविसेसं तमालवीहिअं सज्जीकरेहिति. मलअवदीए सहिदेण जामादुएण एत्थ आगंतव्वं. आणत्ता अमए पल्लविआ. ता जावर अणी विरहजणिदुक्कंठं पिअवअस्सं सेहरअं अण्णेसामि. ( परिक्रम्यावलोक्यच ) कहं एसोसेहरओअंण्णंकंपि इत्थिअं पसादेदि !

विटः ह रिहरपिदामहाणंविगव्विदोजोण जाणईणमिदुं, सोसेहरओचलणे तुझ्झे, णोमालिए, पडई २

( इति पादयोः पतति. )

विदू॰ अरे दासीपुत्ता, मत्तवालिआ, कुदोएत्थ णोमालिआ !

चेटी ( विहस्य ) कहं अहंत्ति करिअ मदपरवसेण सेहरएण अण्णा अत्थिआ पसादीअदि ! ताअलिअंकोवंकरिअ दुवेवि एदे पडिहसिस्सं.

चेटः ( नवमालिकां दृष्ट्वाशेखरकं हस्तेन गृहीत्वा चालयन् )

दूषकाच्या पायांवर डोकें ठेवून म्हणतो.) प्रसन्न हो नवमालिके प्रसन्न हो.

( इतक्यांत चेटी नवमालिका येते. )

**चेटी**— राजकन्या **मलयवती** हिच्या आईनें मला आज्ञा केली आहे कीं, अगे **नवमालिके, कुसुमाकर** बागेंत जाऊन बागेची रक्षक जी **पल्लविका** तिला सांग कीं, **मलयवतीस** घेऊन जांवई बावा बागेंत येणार आहेत. ह्याजकरितां तमाल वृक्षांच्या राईतील जागा झाडून संवरून स्वच्छ सुशोभित करून ठेव. तर आज्ञेप्रमाणें मी **पल्लविकेस** ताकीद दिली. आतां माझा प्राणप्रिय **शेखरक** ह्याचा शोध करितें. तो रात्रभर माझी वाट पाहून उत्कंठित झाला असेल. ( पुढें जाऊन पाहून म्हणते. ) अहो हाच **शेखरक.** हा तर कोणा परस्त्रियेला तिच्या पायां पडून प्रसन्न करीत आहे ! हें काय ?

**विट**— ( विदूषकास **नवमालिका** समजून म्हणतो )

गीति.

हरिहरविधियांलाही जोगर्वेंजाणिनानमायाला.
तोशेखरकतवपदा नमितो, नवमालिके, पहायाला
( असें म्हणून पायांवर मस्तक ठेवतो. )

**विदू०**— अरे रांडलेका मद्यप्या, येथें रे कोठची **नवमालिका** ? मी काय **नवमालिका** ?

**चेटी**— ( हांसून ) काय हा **शेखरक** मद्याच्या गुंगीमध्यें ही मीच आहें अशा भ्रांतीनें परक्या स्त्रीचें आर्जव करीत आहे. तर आतां लटकाच कोप आणून ह्या दोघांचीही फजीती करितें.

**चेट**— ( **नवमालिकेस** पाहून **शेखरकास** हातानें टोंचून

[१४] भट्टका, मुंचमुंच. इअं णोहोइ णोमालिआ. एसा खु णोमालिआ लोसफुल्लंतेहिं लोअणेहिं पेक्खंती इदोज्जेव आअच्छदि.

चेटी. ( उपसृत्य ) [१५] सेहरअ का का खुएसा पसादीअदि ?

विदू. ( अवगुंठनमपनीय ) [१६] अहं मंदभाअधेआए पुत्तो.

विटः. ( विदूषकं निरूप्य सरोषमुत्थायच ) [१७] अरे कपिलमक्कडा-तुमंपि मसेहरअं पतारेसि ? ( मुखेचपेटांदत्वा ) गिण्ह, रे चेट, जाव णोमालिअं पसादेमि.

चेटः. [१८] जं भट्टको आणवेदिति.

विटः. ( विदूषकं विमुच्यचेट्याः पादयोःपतति ) [१९] पसीद, णोमालिए, पसीद.

विदू. ( स्वगतं ) [२०] ऐसोक्खु अवक्कमिदुमवसरो । ( पलायितुमिच्छति. )

चेटः. ( विदूषकं यज्ञोपवीते गृण्हाति. तच्च त्रुट्यति. )

विटः [२१] कहिं कहिं कविल मक्कडा पलाअसि ? ( तमुत्तरीयणे कंठे बध्वापकर्षति. )

विदू. [२२] भोदि णोमालिए, पसीद. पसीद मोचेहिमं.

चेटी. ( विहस्य ) [२३] जई भूमीए सीसं णिवेसिअ चलणेसु मे पडसि ता मोचइस्सं.

विदू. ( सरोषं ) [२४] कहं राअमित्तो भविअसंपदं दासीए पाएसु पडिस्सं. ?

चेटी. ( अंगुल्या तर्जयंती सस्मितं ) [२५] दोणिएव ते पाडइस्सं. सेहरआ, उठेहि पसण्णा खुदेअहं. ( कंठेगृण्हाति. )

म्ह० ) धनीसाहेब, सोडा सोडा ही **नवमालिका** म्हणे, तो पहा **नवमालिका** रागानें डोळे वटारून पहात इकडे येत आहे.

**चेटी**— ( जवळ जाऊन ) अहो **शेखरक**, पायां पडून कोणाचें इतकें आर्जव चाललें आहे ? फार चांगलें करतां.

**विदू०**— ( बुरखा वर सारून ) हा मी दुर्दैवी मातेचा पुत्र आहें.

**विट**— ( विदूषकाला ओळखून क्रोधानें उठून ) अरे काळ्या मर्कटा. तूंही मज **शेखरकाला** फसवितोस काय ? ( त्याच्या तोंडावर चापट मारतो. ) चेटा, मी **नवमालिकेला** प्रसन्न करींपर्यंत तूं ह्याला धरून ठेव.

**चेट**— आज्ञा महाराज. ( तसें करतो. )

**विट**— ( विदूषकास सोडून चेटीच्या पायांवर मस्तक ठेवितो. ) कृपाकर. **नवमालिके**. कृपाकर.

**विदू०**— ( मनांत म्ह० ) पळून जावयास ही संधि चांगली आहे. ( पळून जावयास पाहतो. )

**चेट**— ( विदूषकाचें जानवें धरून ओढतो. तों तें जानवें तुटतें. )

**विट**— कायरे हा काळा माकड पळून जातो काय ? कसा जातो पाहूं ? ( असें म्हणून आंगवस्त्रानें त्याच्या गळ्यास वेढा घालून त्याला ओढतो. )

**विदू०**— अगे **नवमालिके**, कृपाकरून मला सोडीव.

**चेटी**— ( हांसून ) जर भुईला डोकें लावून माझ्या पायां पडशील तर मी तुला सोडवीन.

**विदू०**—( रागावून ) अगे सटवे, मी ब्राह्मण, त्यांत राजाचा मित्र असून दासीच्या पोरीच्या पायां पडूं काय ?

**चेटी**— ( त्याला बोटानें दटावून हांसून म्ह० ) आतां पायां पडावयास लावतें पहा. **शेखरका**, ऊठ ऊठ, मी तुजवर प्रसन्न झालें. ( त्याच्या गळ्याला विळखा घालून ) हा

एसो उण आमादुअस्स पिअवअस्सो बह्मणो तुए खली-किदोएदंसुणिअ कदावि भट्टा मित्तावसू कोवं करेदि ता आदरेण एणं संमाणेहि,

विटः. [२६] जं णोमालिआ आणवेदित्ति ( विदूषकं कंठे गृहीत्वा ) अज्ज, तुमं संबंधिओत्ति करिअ मए उवहसिदो. ( मस्तकं घूर्णयन् ) किंसच्चं जेव्व सेहरओ मत्तवालओ ?

विदू० नहि, नहि.

विटः. [२७] तो किदो पडिहासो. ( उत्तरीयं वर्तुलीकृत्य विदूषकायासनं ददाति. ) इह उपविसदु संबंधिओ.

विदू० [२८] दिट्ठिआ अवगदोविअ से मदावेसो. ( उपविशति )

विटः. अथकिं. ( सहर्षं ) [२९] णोमालिए, उवविस तुमंपि एदस्स समीपे जेण दुवेपि तुम्हे समं जेव्व अहं संमाणइस्सं

चेटी० ( विहस्य उपविशति )

विटः. रे चेट, रे चेट, [३०] सुंभरिअंखु एदंचसअंकरेहि अच्छसुराए.

चेटः.( चषकभरणं नाट्येन करोति )

विटः.( स्वशिरःशेखरात्पुष्पाणि गृहीत्वा चषके विन्यस्य, जानुभ्यां भूमौ निपत्य, नवमालिकाया उपनयति ) [३१] णोमालिए, चक्खिदं देहि एदस्स एदं.

चेटी० ( सस्मितं ) जं सेहरओभणादि. ( तथा करोति )

विटः.(विदूषकस्यचषकमुपनयन्) [३२] एदं णोमालिआ मुहसंसग्गवासविसेसवड्ढिदरसं सेहरआदो अण्णेणकेणवि ण आस्सादि-

ब्राम्हण आपल्या जांवईबावाचा आवडता सोबती आहे. ह्याची तूं टवाळी केली, हें जर मित्रावसूला समजलें तर तो रागें भरेल ह्या साठीं ह्याचा आदरानें सन्मान केला पाहिजे.

विट— बरें, जशी तुझी आज्ञा. ( असें म्हणून विदूषकाच्या गळ्यास मिठी घालून त्यांस म्ह० ) आर्या, तूं आमचा संबंधी झालास म्हणून मी तुझी मस्करी केली. ( मस्तक भोंवंडीत म्ह० ) का मी शेखरक मद्यपालक खराचना ?

विदू०— नाहीं नाहीं.

विट—( आंगवस्त्राची चुंबळ करून विदूषकास आसन देतो. ) अहो मानकरी, आपण ह्या आसनावर बसावें.

विदू०— ह्याची गुंगी उतरली वाटतें. मोठेंच दैव ( खालीं बसतो. )

विट—,उतरली तर काय ? ( हर्षानें ) नवमालिके, तूंही ह्याच्या शेजारीं बैस. तुम्हा दोघांचा बरोबरच सन्मान करतों.

चेटी— ( हांसून खालीं बसते ) ही बसलें पहा.

विट— अरे चेटा, चांगल्या मद्यानें एक प्याला भरून आण.

चेट— ( मद्याचा पेला भरलेला आणतो. )

विट— ( डोक्यावरच्या तुऱ्याचीं फुलें घेऊन त्या पेल्यांत टाकून, गुडघ्यांवर टेंकून, तो पेला नवमालिके कडे करतो. ) नवमालिके, तूं थोडेंसें चाखून हें आमच्या मानकऱ्याला दे.

चेटी— ( हांसून ) शेखरकाची आज्ञा होईल . तसें. ( तसें करिते. )

विट— ( पेला विदूषका पुढें नेतो. ) आर्या, हें उत्तम मद्य नवमालिकेच्या मुखस्पर्शानें फारच सुवासित आणि सरस झालें आहे. असें हें शेखरकाच्या हातानें को-

दं, तापिव एवं अदोअवरं किंदे संम्माणणं करिस्सं ?

विदू० ( सविलक्षस्मितं ) सेहरआ, बाम्हणो खुअहं.

विटः ( सरोषं ) जेई तुमं बम्हणोता कहिं दे दाव बम्हसुतं ?

विदू० ( यज्ञोपवीतं स्वशरीरे अदृष्ट्वा ) तंखुंइमिणा चेडेण किस्समागस्स मे छिण्णं.

चेटी० ( विहस्य ) जेई एवंता वेद क्खराइंपि दावकतिचि दुदाहर.

विदू० भो दि, सीधुगंधेणपिणद्धाइं मे वेदक्खराइं; अहवा किंमह भोदीए सहविवादेण ? एसोदे बह्मणो पाएसु पडिदि.

( पादयोः पतितुमिच्छति )

चेटी० ( हस्ताभ्यां निवार्य ) माखु, माखु एव्वं अज्जो करेदु. ( शेखरकंमति ) सेहरआ सच्चं खु बम्हणो एसो ( विदूषकस्य पादयोः पतित्वा ) अज्ज,ण तुए कुविदव्वं संबंधि आणुरूवो एसो मए परिहासोकिदो.

विटः अंहंविएणं पसादेमि. ( पादयोर्निपत्य ) मरिसअदु अज्जो मदपरवसेण जंमएअवरद्धं, जेण अहंपि णोमालिआए सहअविणअं सेविस्सं

विदू० मरिसिदं मए सव्वं. गछदं तुम्हे. जाव अहंपि अवअस्सं पेक्खामि.

( इतिनिष्क्रांताविटश्चेट श्चेटीच. )

विदू० दिहिआ अदिक्कंतो बम्हणस्स अकालमिच्चू. ताजाव

ग्रास ही मिळालें नाहीं. तें मी आज तुम्हाला देतों ह्याचें प्राशन करावें ह्यापेक्षां मोठा कोणता सन्मान म्यां तुमचा करावा ?

विदू०— ( वाईट तोंड करून ) अरे शेखरका मी ब्राह्मण आहेना ?

विट— ( रागावून ) अरे जर तूं ब्राह्मण आहेस तर तुझें जानवें रे कोठें आहे ?

विदू०— ( कंठांत जानवें नाहीं असें पाहून म्ह० ) अरे, तें चेटानें ओढलें तेव्हां तुटलें वाटतें.

चेटी— ( हांसून ) बरें जानवें राहूं दे. कांहीं वेदाक्षरें म्हण पाहूं.

विदू०— अगे मद्यगंधानें वेदाक्षरें कोंडलीं गेलीं तीं बाहेर पडत नाहींत अथवा तुझ्याशीं इतका विवाद कशाला पाहिजे ? हा ब्राह्मण तुझ्या पायां पडतो ( असें म्हणून तिच्या पायां पडावयास जातो. )

चेटी— ( हातानें त्याचें निवारण. करून म्ह० ) नका नका, महाराज असें करूंनका. ( शेखरकास म्ह० ) शेखरका, हा ब्राह्मण आहे खरा. ( विदूषकाच्या पायां पडून ) आर्या, आपण रागें भरूंनका. तूं संबंधी समजून मी मस्करी केली.

विट— मी ही ह्याला प्रसन्न करितों. ( त्याच्या पायांवर डोकें ठेवून ) आर्या, क्षमा करा क्षमा करा. म्यां मद्यानें बेशुद्ध होऊन आपला अपराध केला या बेशुद्धपणांत मीं नवमालिकेची देखील अमर्यादा केली.

विदू०— मीं सर्व क्षमा केली. आतां तुम्ही जा कसे येथून. मीहि आपल्या प्रिय मित्राकडे जातों.

( इतकें झाल्यावर विट, चेट, चेटी जातात. )

विदू०— मज ब्राह्मणाचा हा अकाळ मृत्युच टळला. हें मो·

अहं मत्तवालिअसंगदूसिदो इहदिद्धिकाए ण्हाइअ पेक्खामि पिअवअस्सं. ( तथा करोति ) ( नेपथ्याभिमुखमवलोक्य ) एसोखु पिअवअस्सो रूविणिविअसअवरलछीं मलअवदीं हत्थे वलंबिअ इदो ज्जेव आअछदि. ताजाव गदुअसे पास्सवत्ती होमि.

( ततःप्रविशति विवाहवेषालंकृतो नायकः, मलयवती, विभवतश्च परिवारः )

नायकः. ( मलयवतीं निरूप्य )

दृष्टादृष्टि मधो ददाति, कुरुते नालाप माभाषिता;
शय्यायां परिवृत्यतिष्ठति; बलादालिंगितावेपते;
निर्यांतीषु सखीषु वासभवनान्निर्गंतु मेवेहते,
जातावामतयैव मेद्य सुतरां प्रीत्यै नवोढा प्रिया.

( मलयवतीं पश्यन् ) प्रिये मलयवति,

हुंकारैर्ददता मया प्रतिवचो यन्मौन मासेवितं
यद्भावानलदीप्तिभिस्तनुरियं चंद्रातपैस्तापिता,
ध्यातं यन्सुबहून्यनन्यमनसा नक्तंदिनानि, प्रिये,
तस्यै तत्तपसः फलं मुखमिदं पश्यामि यत्तेधुना. ५

ठच भाग्य म्हणावें. असो, ह्या मूर्ख मंद्याच्या समागमानें मी दोषी झालों. ह्या साठीं ह्या विहिरी मध्यें स्नान करून मग आपल्या प्रिय मित्राकडे जावें. (असें म्हणून तसें करतो.)

(पडद्या कडे पाहून) हा माझा प्रिय मित्र, मूर्तिमंत स्वयंवर लक्ष्मीच काय अशा **मलयवतीस** हातीं धरून इकडेसच येत आहे. तर आपण लौकर जाऊनें त्याच्या बरोबर असावें.

(इतक्यांत विवाहवेष करून **नायक** आणि **मलयवती** परिवारासहित येतात.)

**नायक**—(**मलयवती** कडे पाहून मनांत म्ह०)

साक्या.

होतां दृष्टादृष्ट अधोमुख होउनि खालीं बघते;
कांहिं निमित्तें बोलविली तरी मौन धरोनी बसते, १
शयनावरि जातांच मजकडे पाठकरुनियां निजते;
आलिंगिली बळें तरिकंपिततनु घामानें भिजते; २
शयनगृहापासून सखीजन निघतां बहु गडबडते;
त्यांच्या पाठोपाठ लागलिच जाया बाहिर पडते; ३
जरी प्रिया प्रतिकूलपणानें वागुनि फुंदुनि रडते;
तरी नवोढा[1] फारच माझ्या चित्ताला आवडते. ४

(**मलयवतीस** पाहून तिला म्हणतो.)

शार्दूलविक्रीडितवृत्त.

हूंहूंमात्र म्हणूनियां प्रतिवचीं जें मौन म्यां सेविलें,
तैसें जें तनुला दवानलसमीं चंद्रातपीं ताविलें,
रात्रंदीस बहूत काळहि तुझें जें ध्यान म्यां ध्याइलें,
त्याचें हें फळ सुंदरी मुख तुझें म्यां लोचनीं पाहिलें.

---

१ नव्यानें लग्न झालेली.

**नायिका.** ( अपवार्य ) हंजे[43] चंउरिए, ण केवलं दंसणीओ पि-
अंपि भणिदुं जाणादि.

**चेटी.** ( विहस्य ) [44] अयि, पडिपक्खवादिणि, सच्चकं जेव्व ए-
दं, किं एत्थ पड्डिवअणं.

**नायकः** चंतुरिके, आदेशय मार्गं कुसुमाकरोद्यानस्य.

**चेटी.** [45] एदु एदु भट्टा.

**नायकः.** ( परिक्रमन् नायिकां निर्दिश्य ) स्वैरं स्वैरमागच्छतु
भवती, यतः

खेदायस्तनभारएष किमुते मध्यस्य, हारो पर;
स्ताम्यत्यूरुयुगं नितंबभरतः, कांच्यानया किंपुनः;
शक्तिः पादयुगस्य नोरुयुगलं वोढुं, कुतोनूपुरौ;
स्वांगैरेव विभूषितासि, वहसि क्लेशाय किंमंडनं ! ६

**चेटी.** [46] एदं तं कुसुमाकरुज्जाणं. ता पविसदु भट्टा.

( सर्वे प्रविशंति )

**नायकः.** ( समंतादवलोक्य ) अहो रमणीयता कुसुमाकरो
द्यानस्य ! ( तथाहि )

निष्यंद श्चंदनानां शिशिरयति लतामंडपे कुट्टिमांतान्,
श्रुत्वा धारागृहाणां ध्वनिमनुतनुते तांडवंनीलकंठः,
यंत्रोन्मुक्तश्च वेगाच्चलति विटपिनां पूरयन्नालवाला
नापातोत्पीडहेलाहतकुसुमरजः पिंजरोयं जलौघः ७.

अपिच

नायिका—( एकीकडे तोंड करून ) सखि चतुरिके हा केवळ देखणा आहे इतकेंच नाहीं. तर गोड भाषण करण्याविषयींही चतुर आहे.

चेटी—( हांसून ) खरेंच आहे. ते काय खोटें बोलतात म्हणून ह्यावर उत्तर द्यावें ?

नायक— चतुरिके, कुसुमाकर बागेची वांट कोणती ती दाखीव.

चेटी— इकडून असें यावें महाराजांनीं.

नायक—( पुढें जाऊन नायिकेस उद्देशून म्ह० ) हे प्रिये, तूं हळूहळू सावकास ये. कारण कीं; तुला क्लेश होतात.

शार्दूल विक्रीडित वृत्त.

होतो, हा कुचभार फार कटिला कांहार, गे घालिशी ?
मांड्या या थकल्या नितंब धरितां, कांची हि कां बांधिशी ?
नाहीं ऊरु धरावया बळ पदीं, हीं नूपुरें दूषणें.
अंगे रम्य अशीं असूनि धरशी क्लेशार्थ कां भूषणें ?

चेटी— महाराज, हीच कुसुमाकर बाग. आपण आंत चलावें. ( सर्व प्रवेश करितात. )

नायक—( आसमंतात् अवलोकन करून ) काय हो ह्या बागेची शोभा रमणीय दिसते ही !

अभंग.

लतांच्यामंडपीं चंदनाचेसडे, थंडचोंहीकडेभूमीझाल्या. १
कारंज्याच्याधारा उडतीसमोर, नाचतातीमोर आनंदानें. २
पाण्याचेप्रवाह पाटोंनचालती, आळींभरितातीवृक्षांचींहे. ३
पुष्पांचेपराग वाहोनीयांनेती, रंगीतदीसती ओघतेणें. ४
आणखीं चमत्कार.

अमी गीतारंभे मुखरितलतामंडपभुवः,

परागैः पुष्पाणां प्रकटपटवासव्यतिकराः,

पिबंतः पर्याप्तं सह सहचरीभिर्मधुरसं

समंतादापानोत्सव मनुभवंतीह मधुपाः ८

**विदू०.** ( उपसृत्य ) जेदु[१०] जेदु भवं. सोत्थि भोदीए.

**नायकः.** ( विहस्य ) चिरादायातोसि.

**विदू०.** वअस्स, लहु जेव्व आअदोम्हि. किउण विवाहमंगल महूस्सवमिलिदसिद्धविज्जाहरावाणअदंसणकोदूहलेण पडिब्भमंतो एत्तिअं वेलं विलंबिदोम्हि ता पिअवअस्सो विएदं पेक्खदु.

**नायकः.** यथाह भवान्. ( समंतादवलोक्य ) भोवयस्य,

दिग्धांगा हरिचंदनेन, दधतः संतानकानां स्रजो,

माणिक्याभरणप्रभाकृतिकरैश्चित्रीकृताच्छांशुकाः,

सार्द्धं सिद्धजनैर्मधूनि दयितापीतावशिष्टान्यमी

मिश्रीभूयं पिबंति चंदनतरुच्छायासु विद्याधराः ९

ओंव्या.

भृंगांनीं[1] गायन आरंभिलें ॥ तसे त्यांचे प्रतिशब्द[2] उठले ॥
त्या नादांनीं नादित[3] झाले ॥ लता मंडप ॥ १ ॥
पुष्पांतील सुगंध पराग[4] ॥ लागतां रंगलें जयांचें आंग ॥
गुलाल बुका सुरंग ॥ उधळिती जाणों ॥ २
सर्वे घेऊनि सहचरी[5] ॥ मधुपान करिती धणीवरी[6] ॥
जयांची आशा न पुरेतरी ॥ मधुपानाची ॥ ३ ॥
ऐसे आसमंतात उमार[7] ॥ चित्तीं धरूनियां हुरुप[8] ॥
आनंद अनुभविती मधुपें[9] ॥ पानोत्सवाचा[10] ॥ ४ ॥

**विदू०**— ( जवळ जाऊन ) मित्रा तुझा जयजयकार असो. ( **मलयवतीस** ) मुली तुझें कल्याण असो.

**नायक**— ( हांसून ) मित्रा, फार उशीर लावलास यावयास.

**विदू०**— मित्रा, मीं लौकरच आलों असतों, परंतु, विवाह मंगलोत्सवाकरितां सिद्ध, विद्याधर एकत्र मिळाले आहेत, त्यांचा पानक समारंभ पहावया करितां इकडे तिकडे फिरतां फिरतां इतका वेळ लागला. तो चमत्कार त्वां पहावया जोगा आहे.

**नायक**— खरें, तूं म्हणतोस तसेंच आहे. ( आसमंतात पाहून ) हे मित्रा, पहा हे.

ओंव्या.

आंगीं हरिचंदनाची उटी, सुरतरु[1] पुष्पांच्या माळा कंठीं.
धरितीं रत्नाभरणें गोमटीं, तेणेंचि चित्रितवस्त्रें भासती १
ऐसेविद्याधर सिद्धजन, चंदन तरुतळीं बैसोन,
प्रमदांचें[2] उच्छिष्ट मद्यघेऊन, प्राशन करिती आनंदें. २

---

१ भुंग्यांनीं. २ प्रतिध्वनि, ३ शब्दयुक्त. ४ रेणु. ५ स्त्रिया. ६ पोटभरेपर्यंत. ७ बहुत. ८ आवेश. ९ भ्रमर. १० मधुपान.

१ कल्पवृक्ष. २ स्त्रियांचें.

तदेहि वयमपि तमालवीथिकांगच्छाम:

( सर्वे परिक्रामंति. )

विदू० भोवँअस्स, एसा खु तमालवीथिआ; एइं सरदसंदाव खेदिदं भोदीए वअणं लक्खीअदि. ताइहफलिअसिला-दले उपविसदु.

नायकः. सम्यगुपलक्षितं.

एतन्मुखं प्रियायाः शशिनं जित्वाकपोलयोः कांत्या,

तापानुरक्तमधुना कमलं भ्रुत्र मीहते जेतुं १०

( मलयवतीं हस्ते गृहीत्वा ) प्रिये, इहोपविशामः

( सर्वेप्युपविशंति )

नायकः. ( नायिकाया मुखमुन्नमय्य ) पश्य, प्रिये, वृथात्व मस्माभिः कुसुमाकरोद्यानकुतूहलिभिः खेदितासि, कुतः

एतत्ते भ्रूलतोद्भासि, पाठलाधरपल्लवं,

मुखं नंदन मुद्यान; मतोन्यत्केवलंवनं ११

चेटी. ( सस्मितं विदूषकं निर्दिश्य ) सुंदंतुए एव्वं भट्टिदारिआ, कहंवण्णीअदि?

विदू० चेंडरिए, माएव्वं गव्व मुव्वह. अम्हाणं पिमज्झेदंसणी

तर चल आपणही तमाल वृक्षांच्या राईकडे जाऊं. ( सर्व पुढें जातात. )

विदू०— मित्रा, हीच तमाल वृक्षांची राई. आंत प्रवेश करावा. शरत्कालच्या उन्हानें ह्या मुलीचें तोंड सुकलेलें-सें दिसतें. ह्यासाठीं ह्या स्फटिक शिळेच्या चौकीवर क्षणभर बसावें.

नायक— मित्रा, तूं चांगलें पाहिलें. तसें झालें आहे खरें. पहा.

गीति.

जिकी मुखप्रियेचें गालांच्या कांतिनेंचि चंद्राला,
ते गाल लाल होतां पाहे जिंकावयास पद्माला.

( मलयवतीचा हात धरून, ) प्रिये, आपण ह्या स्फटिक शिलातलावर अंमळ बसूं.

( सर्व खालीं बसतात. )

नायक— ( नायिकेची हनवटी वर उचलून तिला म्ह० ) प्रिये, कुसुमाकर बागेची शोभा पहावयाच्या कौतुकानें आम्हीं तुला येथें आणून व्यर्थ श्रम दिला. नाहीं बरें ?

कामदा छंद.

कुटिल भोंवया[1] जेथ शोभती, अधरें[2] पल्लवीं पाटलें[3] द्युती,
मुख असें तुझें हेंच नंदन[4], स्वर्गीचें दुजें रूक्षतें वन.

चेटी— ( हांसून विदूषकास म्ह० ) ऐकिलें काय ? कसें वर्णन चाललें आहे तें ? आमची राजकन्या अशीच आहे.

विदू०— चतुरिके, तूं गर्व वाहूं नको. आम्हांमध्येंही देखणी

१ वांकड्या. २ ओठावर. ३ तांबडारंग. ४ आनंद देणारें खरें. ५ स्वर्गीचें नंदन तें रूक्षवन.

ओजणो अत्थि. जेव; केवलं मत्सरेण कोवि णव्वण्णेदि.

चेटी. ( सस्मितं ) अज्ज, अहं तुमं वण्णेमि.

विदू॰ ( सहर्षं ) जीवाविदोम्हि. करेदु भोदीपसाअं. ता जेणण एसो पुणोमं भणादि जधाईदिसो कविलमक्कडओत्ति.

चेटी.- अज्जा, मए तुमं विवाहजागरणे णिद्दाअमाणो मीलिदक्खो दिट्ठो. ता तहिं अव्व चिठ, जेण दे वण्णेमि.

विदू॰ तथाकरोति

चेटी. ( आत्मगतं ) जाव एसो णिमीलिदक्खो चिठइ, ताव णीलरसाणुकारिणा तमालपल्लवरसेण मुहं से कालीकरिस्सं. ( उत्थाय पल्लवग्रहणं तन्निपीडनंचनाटयति. )

( नायको नायिकाच विदूषकं पश्यतः )

नायकः. वयस्य, धन्यःखल्वसि, योस्मासु तिष्ठत्सु त्वमेव वर्ण्यसे.

चेटी. ( तमालरसेन विदूषकस्य मुखं कालीकरोति. )

नायिका. ( सस्मितं दृष्ट्वा नायकं पश्यति )

नायकः.

स्मितं पुष्पोद्गमोयंते, दृश्यते धरपल्लवः

फलंसुजातं मुग्धाक्षि, चक्षुषोर्मम पश्यतः १२

विदू॰ चेटीए, किं तुएकिदं ?

माणसें कोणी आहेत. पण मत्सरा मुळें त्यांचें कोणी वर्णनच करीत नाहीं. इतकेंच.

चेटी— ( किंचित् हांसून ) आर्या, मी तुझें वर्णन करितें.

विदू०— ( हर्षपावून ) एकदांचा मी वांचून आलों. आतां तूं मजवर कृपाकर. पुरे तुझें वर्णन. मला पुन्हा कपिल मर्कट म्हणणार. हेंचना ?

चेटी— असें नव्हें. आर्या, विवाहांतल्या जागरणानें तुझे डोळ्यांत झोंप भरल्यामुळें तुझे डोळे मिटत आहेत असें मी पाहतें. तर असाच डोळे मिटून बैस, तसेंच मी तुझें वर्णन करितें.

विदू०— बरें. कांहोईना. ( डोळे मिटून बसतो )

चेटी— ( मनांत ) जोंपर्यंत हा डोळे मिटून बसला आहे तोंपर्यंत तमाल पत्रांचा काळ्या रसानें ह्याचें तोंड माखून काळें करावें. ( असें म्हणून उठून तमालवृक्षाचा पाला हातावर चोळून त्याचा रस काढल्या सारखें करते. )

( नायक नायिका विदूषकाकडे पाहतात. )

नायक— मित्रा, तूं धन्य खरा. आम्हां सर्वांस टाकून तुझेंच वर्णन चाललें आहे.

चेटी— ( तमाल पल्लवाच्या रसानें विदूषकाचें मुख काळें करिते. )

नायिका— विदूषकाकडे पाहून हांसून नायका कडे पाहते.)

नायक— ( नायिकेस म्हणतो. ) हे प्रिये,

गीति.

हास्यतुझें पुष्पासम दिसतें, हा अधर पल्लव समान.
मुग्धाक्षि, चक्षुमाझें बघतां तुज जाहलें सफल जाण.

विदू०— सटवे, हें काय केलें त्वां ?

चेटी णं' वण्णिदोसि.

विदू० ( हस्तेन मुखं प्रमृज्य हस्तं दृष्ट्वा सरोषं दंडकाष्ठमुद्य·म्य ) आँः दासीएधीए, राअकुलं खुएदं. किंदेत्थ करिस्सं ? ( नायकं निर्दिश्य ) भो, तुम्हाणं पुरदो ज्जेव अहं दासी एधीए खलीकिदो. दावकिं मह एत्थट्ठिदेण ? अण्णदागेमि स्संदाव.

( निष्क्रामति )

चेटी. सैच्चं कुविदो मे अज्जउत्तो, जाव अणुगदुअ परावट्टइस्सं.

( गंतुमिच्छति. )

नायिका. 'हंजे चउरिए, कहंमं एआइणिं.

उज्झिअ दाणिं गच्छसि ?

चेटी. ( नायकमुद्दिश्य सस्मितं ) एव्वं तुमंजेव्व एआइणी चि·रंहोहि ( इतिनिष्क्रांता )

नायकः

दिनकरकरामृष्टं, बिभ्रद्द्युतिं परिपाटलां,
दशनकिरणैरुत्सर्पद्भिः स्फुटीकृतकेसरं,
अइ, मुखमिदं, मुग्धे, सत्यं समं कमलेन ते
मधु मधुकरः किंत्वेतस्मिन्निबन्नविभाव्यते १३

चेटी— हें तुझें *वर्णन केलें.

विदू०— ( हातानें तोंड पुसून, हात काळा पाहून क्रोधानें दांडकें उचलून ) हा बटकीचे पोरी, ( असें म्हणून तिला मारायास जातो. ती हांसून दूर सरते. ) मी राजाश्रित आहें. आज मी तुझी कोणती दशा करूं ? ( नायकास उद्देशून ) अहो तुमच्या समक्ष ह्या बटकीच्या पोरीनें माझी अशी थट्टा करावी काय ? तर येथें बसून काय फळ ? मी जातों दुसरी कडे.

( असें म्हणून उठून चालताहोतो. )

चेटी— आमचे यजमान खरोखरींच रागावले वाटतें. आतां त्यांच्या मागें जाऊन त्यांला प्रसन्न करून परत आणीन. असें बोलून ( जावयास उठते. )

नायिका-- अगे चतुरिके, ह्या वेळेस मला एकटी टाकून तूं चाललीस कोठें ?

चेटी ( नायका कडे बोट दाखवून हांसून म्ह० ) अशीच एकटी चिरकाळ ऐस. ( असें म्हणून निघून जाते. )

नायक— प्रिये, मला असें वाटतें.

हरिणी वृत्त.

दिनकर करस्पर्शें[1] ज्याची[2] द्युती[3] परिपाटला[4],
किरण गमती दंताचे ते सुकेसर याजला,
सखि मुख तुझें ऐसें पद्मा समानचि भासतें,
मधुकर[5] मधू याचे आतां पिईल न कायतें ?

---

* हा शब्द दोन अर्थी योजला आहे; वर्णन ह्मणजे गुणकथन व वर्णन ह्मणजे रंगिवणें.

१ सूर्य किरण. २ मुखाची. ३ कांती. ४ तांबडी. ५ भ्रमर.

नायिका. ( विहस्य मुखमन्यतो नयति )

नायकः. ( पुनस्तदेवपठति. )

ततः प्रविशति चेटी. )

चेटी. ( सहसा उपसृत्य ) एसो खु कुमारमित्तावसू कज्जेण केणावि णायकं पेक्खिदुं आअदो.

नायकः. प्रिये, गच्छत्वमात्मनो गृहं. अहमपि मित्रावसुं दृष्ट्वा त्वरितमागतएव.

( नायिका चेट्यासह निष्क्रांता. )

( ततः प्रविशति मित्रावसुः.

मित्रावसुः.

अनिहत्य तं समर्थः, कथमिव जीमूत वाहनस्याहं,
कथयिष्यामितव हृतं राज्यं रिपुणेति निर्लज्जः १४
तथाप्यनिवेद्य नयुक्तं गमनमिति निवेद्य गच्छामि.

( इति उपसर्पति, )

नायकः. मित्रावसो, इतआगम्यतां.

( मित्रावसु रुपविशति. )

नायकः. ( निरूप्य ) मित्रावसो, संरब्धइव लक्ष्यसे ?

मित्रावसुः. कः खलु मतंगहतके संरंभः !

नायकः. किं कृतं मतंगहतकेन ?

मित्रा० स्वात्मविनाशाय युष्मदीयं राज्यं किलसमाक्रांतम्

नायकः ( सहर्षमात्मगतं ) अपिनाम सत्यमेवैतत्स्यात्. ?

नायिका— ( हांसून मुख एकीकडे करते. )

नायक— ( पुन्हा तेंच म्हणतो. )

( इतक्यांत चेटी येते. )

चेटी ( अकस्मात जवळ जाऊन ) हा युवराज मित्रावसु कांहीं कार्याच्या निमित्तानें महाराजास भेटावयास आला आहे.

नायक— प्रिये, तूं आपल्या मंदिरांत जा. मीही मित्रावसूला भेटून हा पाठोपाठ आलोंच. ( चेटीला घेऊन नायिका निघून जाते. )

( इतक्यांत मित्रावसु येतो. )

मित्रावसु— ( मनांत म्ह० )

गीति.

शत्रुंन वधितां, जाउनि कळवूं जीमूतवाहनास कसें,
निर्लज्ज पणें, कीं तव हरिलें त्यानें समस्तराज्य, असें ?

तथापि सांगितल्या वांचून राहतां नये. तर सांगून जावें हें बरें. ( असें म्हणून जवळ जातो. )

नायक— मित्रावसो, यावें. खालीं बसावें.

( मित्रावसु खालीं बसतो. )

नायक— ( पाहून ) मित्रावसो, अगदीं तयारींत आहेस असा दिसतोस ?

मित्राव०— कशाची तयारी. त्या मतंगहतकाला ?

नायक— काय केलें त्या मतंगहतकानें ?

मित्राव०— आपला नाश करून घेण्या करितां त्यानें तुमचें राज्य बळकावलें.

नायक— ( हर्षानें मनांत म्ह० ) ही गोष्ट खरीच असेल तर

मित्रा० तदुच्छित्तये मामेवाज्ञापयतुकुमारः. किंबहुना १

संसर्पद्भिः समंता, त्कृतसकलवियन्मार्गयाने र्विमानैः,

कुर्वाणाः प्रावृषीव स्थगितरविरुचःश्यामतां वासरस्य

एते याताश्च सद्यस्तव वचनमितःप्राप्य युद्धाय सिद्धाः,

सिद्धं चोद्वृत्तशत्रुक्षयभयविनमद्राजकं ते स्वराज्यं १५

अथवा किंबलौघैः १

एकाकिनापिहिमया, रभसावकृष्ट

निस्त्रिंशदीधितिसटाभरभासुरेण,

अग्रेनिपत्यहरिणाचयथा गजेंद्र

माजौमतंगहतकंहतमेवविद्धि १६

नायकः ( आत्मगतं कर्णौपिधाय ) अहह दारुणमभिहितं;

अथवा एवंतावत्. ( प्रकाशं ) किंत्वेतद्बहुतरमतोपि बाहु

शालिनिन्वयि संभाव्यते. किंच

स्वशरीरमपिपरार्थेयः खलुदद्यादयाचितःकृपया,

राज्यस्यकृते सकथंप्राणिवधक्रौर्यमनुमनुते १७

अपिच क्लेशान्, बिहायान्यत्र

मित्राव०— त्याचा पराभव करण्याविषयीं आपण मला आ-ज्ञा करावी. फार काय सांगूं ?

ओंव्या.

जिकडे तिकडे पसरलीं, आकाशींविमानें दाटलीं,
मेघासारखी छांयापडली, आच्छादिलें सूर्यातें १
ऐशाविमानीं बसोनींआले, युद्धकरावयासिद्ध झाले,
ऐसेहेसैनिक वहिले, आज्ञा तुझी मागती. २
झालादुष्ट शत्रूचाक्षय, स्वकीयराज्या नाहींभय,
असें समजावें निःसंशय, आज्ञा मात्र अर्पावी. ३
अथवा सैन्य तरी कशास पाहिजे ?

वसंततिलकावृत्त.

मी एकटाच अतिसत्वर धांव घेतों,
ओढूनखड्ग अरिमस्तकिं घाव देतों;
पाडूनि भूमिवरि हत्तिस सिंह जैसा,
युद्धीं मतंगहतकासि वधीन तैसा.

नायक— ( कानावर हात ठेवून मनांत म्ह० ) अरेरे ! हें कठोर भाषण निघालें. ( उघडपणें ) तुझ्या सारख्या वीरास हें काय ? ह्याहूनही अधिक संभवतें. आणखी मला विचा-रशील तर असें आहे.

गीति.

स्वशरीरही पराच्याअर्थी देणार जो दयालु असा,
राज्यार्थ घोरहिंसा कर्मातें तो करील मान्यकसा ?
आणखी एक तुला सांगतों. क्लेशवैरीजकरून दुसऱ्या-

* क्लेश म्हणजे दुःख. हा शब्द बौद्ध मतांत दुःख करणाऱ्या ज्या अनेक विध विषयवासना त्यांस लावला आहे, तोच अर्थ प्रकृतस्थलीं घ्यावयाचा.

शत्रुबुद्धिरेव नास्ति. तद्यदि ते स्वप्रियंकर्तुमीप्सितं, तदनु

कंप्यतामसौक्लेशवशीकृतस्तपस्वी.

मित्रावसु० ( सामर्ष सहासंच ) कथंनानुकंप्यते यादृशो सा-

वस्माकमुपकारी कृतज्ञश्च ?

नायकः ( स्वगतं ) अत्ययमकोपाक्षिप्तचेतास्तावदयंनशक्यते

निवर्तयितुं. ( प्रकाशं ) मित्रावसो, उत्तिष्ठ अभ्यंतरमेव

प्रविशावः तत्रैव त्वांबोधयिष्यामि. संप्रतिहि परिणतमहः;

तथाहि.

निद्रा मुद्रामबंधान्मधुकरमनिशंपद्मकोशादपास्य,

न्नाशापूरैककर्मप्रवणनिजकरप्रीणिताशेषविश्वः;

दृष्टःसिद्धैः प्रयुक्तस्तुतिमुखरमुखैरस्तमभ्येषयास्य,

न्नेकःश्लाघ्योविवस्वान्परहितकरणायैवयस्यप्रयासः १८

( तृतीयोंकः समाप्तः

तर माझी शत्रु बुद्धिच नाहीं. तर माझें मित्र करावें अशी जर तुझी इच्छा आहे, तर क्लेशांच्या स्वाधीन झालेल्या या बापड्या मतंगावर त्वां कृपा करावी.

**मित्राव०—** ( रागावून व हांसून म्ह० ) आपणावर उपकार करणारा व कृतज्ञ मतंगावर दया कोण नाहीं करणार ?

**नायक—** ( मनांत म्ह० ) ह्यांच्या मनांत तर कोपाचा आवेश ताजा आहे. ह्याचें निराकरण करून उपयोग नाहीं. ( उघडपणें ) **मित्रावसो**, ऊठ, आपण एकांतीं जाऊं. तेथें तुला कायतें समजून सांगेन. आतां सूर्यास्ताचा समय झाला आहे. पहा.

स्रग्धरा वृत्त.

निद्रेपासून जागे मधुकर करुनी घालवी पद्मकोशा
बाहेरीजो, जगाच्या पुरविनिजकरानींच जो सर्व आशा[1],
सिद्धांनीं वंदिला जो, चरमगिरिस जो पाहतो जावयास,
तोएकश्लाघ्यभास्वान्[2] परहित करणालागि ज्याचा प्रयास.

( इतकें झाल्यावर सर्व निघून जातात. )

तिसरा अंक समाप्त.

---

१ वांच्छा व दिशा. २ सूर्य.

( ततःप्रविशति कंचुकी, गृहीतवस्त्रयुगःप्रतीहारश्च )

कंचुकी

अंतःपुराणां विहितव्यवस्थः,

पदे पदे हं स्खलनानि रक्षन्

जरातुरः संप्रति दंडनीत्या

सर्वं नृपस्यानुकरोमिवृत्तं १

प्रतीहारः आर्य वसुभद्र, क्वभवान् प्रस्थितः ?

कंचुकी. आदिष्टोस्मि महादेव्या महाराजविश्वावसुजनन्या;

## अंक ४.

### पात्रें.

| | |
|---|---|
| कंचुकी. | विश्वावसूचा चोबदार. |
| प्रतीहार. | त्याचाच द्वारपाळ. |
| नायक. | जीमूतवाहन. |
| मित्रावसु. | विश्वावसूचा पुत्र. |
| शंखचूड. | कोणी सर्प विशेष. |
| वृद्धमाता. | शंखचूडाची आई. |
| किंकर. | वासुकीचा सेवक. |
| गरुड. | पक्ष्यांचा राजा. |

प्रारंभ.

( तदनंतर वस्त्रयुग्म घेऊन सुनंदनामा प्रतीहार आणि वसुभद्रनामा कंचुकी हे दोघे येतात. )

**कंचुकी**— ( आपणाशीं बोलतो. )

इंद्रवंशा वृत्त.

अंतःपुरांची[1] स्थिति नित्य लक्षितों,
पदोपदीं मी स्खलनें[2] हि रक्षितों,
जरेमुळें दंडकरीं[3] धरीतसें,
सारीनृपाचीकरणी[4] करीतसें १

**प्रतीहार**— आर्या वसुभद्रा, तूं कोणीकडे निघालास ?

**कंचुकी**— मी का ? सांगतों. मित्रावसूची माता महादेवी

---

१ पुरांच्या आंतली किंवा जनानखान्याची व्यवस्था.

२ अडखळणें किंवा चुक्या. ३ काठी किंवा शासनें. ४ अनुकरण

यथा कंचुकिन्, त्वया दशरात्रं यावत् मलयवत्याजामा-तुश्च रक्तवासांसिनेतव्यानि. राजदुहिता मलयवती श्वशु-रकुले वर्तते. जीमूतवाहनोपि युवराजमित्रावसुनासह समुद्रवेलांद्रष्टुमर्थंगतः, इतिमया श्रुतं. तन्नजाने, राजपुत्र्याः सकाशं तावद्गच्छामि, उताहो जामातुरिति.

**प्रतीहारः.** आर्य, वरं राजपुत्र्याः समीपंगतोसि. तत्रकदा-चिदियत्यां वेलायां जामातापि तत्र मत्यागतएव भविष्यति.

**कंचु॰** सुनंद, साधूपदिष्टं भवता. भवता पुनः कगम्यते. ?

**प्रती॰** अहमपि महाराज विश्वावसुना समादिष्टः, यथा सुनंद, गच्छमित्रावसुं ब्रूहि, अस्मिन्दीपमतिपदुत्सवे मलयवत्या जामातुश्चैतदुत्सवानुरूपं यत्किंचिन्मदीयते. तदागत्य निरू-प्यतामिति, तद्गच्छतु राजपुत्रीसकाश मार्यः. अहमपि यु-वराजमित्रावसोरानयनाय गच्छामि. ( इति निष्क्रांतौ )

( विष्कंभकः )

( ततःमविशति जीमूतवाहनो, मित्रावसुश्च )

**नायकः.** मित्रावसो,

हिनें मला आज्ञा केली आहे कीं; अरे वसुभद्रा, तूं दहादिवसपर्यंत कन्या मलयवती आणि जामाता जीमूतवाहन ह्यांच्या करितां दोन रक्तवस्त्रें घेऊन जातजा. राजकन्या मलयवती श्वशुरगृहीं आहे. जीमूतवाहनही युवराज मित्रावसु ह्यास बरोबर घेऊन समुद्रतीराची शोभा पहावयास आज गेला आहे. असें ऐकतों. तर मला समजत नाहीं कीं, आतां राजकन्येकडे जावें किंवा जामात्याकडे जावें ?

प्रतीहार— आर्या, मला वाटतें राजकन्येकडे जावें हें बरें. कदाचित् इतक्या वेळांत जामाताही तेथें परत आला असेल.

कंचुकी— सुनंदा, फार चांगलें सांगितलें त्वां. बरें पण तूं कोणीकडे चाललास ?

प्रतीहार— मलाही महाराज विश्वावसु ह्यानें आज्ञा केली आहे कीं, अरे सुनंदा, मित्रावसूला जाऊन सांग कीं, दिवाळीच्या सणाचे दिवशीं मलयवतीला आणि जावयाला उत्सवानुरूप कांहीं द्यावयाचें योजिलें आहे, तें बरोबर आहे कीं नाहीं तें येऊन पहावें, म्हणून. तर तूं राजकन्येकडे जा. मीही युवराज मित्रावसु ह्यास बोलावयास जातों.

( असें बोलून दोघे निघून जातात. )

हा विष्कंभक[1] झाला.

( इतक्यांत जीमूतवाहन आणि मित्रावसु येतात. )

नायक— मित्रावसो मला वाटतें,

---

१ पूर्वोत्तर कथेची सूचना.

शय्या शाद्वल, मासनं शुचिशिला, सद्मद्रुमाणामधः,

शीतं निर्झरवा रि पान, मशनं कंदाः, सहायामृगाः,

इत्यप्रार्थितलभ्यसर्वविभवे स्नेषोंयमेकोवने,

दुःखप्रार्थिनियत्परार्थघटनावंध्ये वृथास्थीयते. २

**मित्रावसुः**. ( ऊर्ध्वमवलोक्य ) कुमार, त्वर्यतां त्वर्यतां, समयोयं चलितु मंबुराशेः.

**नायकः**. ( आकर्ण्य ) सम्यगुपलक्षितं.

उद्गर्जज्जलकुंजरेंद्ररभसास्फालानुबंधोद्धतः,

सर्वाःपर्वतकंदरोदरभुवः कुर्वन्प्रतिध्वानिनीः,

उच्चैरुच्चरति ध्वनिः श्रुतिपथोन्माथी यथायं, तथा

प्रायः प्रेंखदसंख्यशंखधवला वेलेयमागच्छति ३

**मित्रा०** कुमार, ननु समागतैव वेला. पश्य.

कवलितलवंगपल्लवकरिमकरोद्गारसुरभिणापयसा

एषा समुद्रवेला रत्नद्युतिरंजिता भाति ४

तेदहि अस्माज्जलप्रसरणमार्गादपक्रम्याने.

नैव गिरिसानुसमीपमार्गेण परिक्रमावः.

( परिक्रम्यावलोक्यच )

**नाय०** मित्रावसो, पश्य पश्य शरत्समयपांडुभिः पयोदपटलैः समावृताः प्रालेयाचलशिखरश्रियमुद्वहंत्येते मलयाचलसानवः.

शार्दूल विक्रीडितवृत्त.

शय्याशाद्वल[1], आसनें शुचि[2]शिला, सद्मेंतरूंचींतळें,
पानां निर्झरवारि, कंदअशना; संगींमृगांचीं कुळें,
हें अप्रार्थित सर्व वैभववनीं; हें एक येथें उणें,
नाहीं होत परोपकार कधिंही. येथें वृथाराहणें.

**मित्रावसु—** ( वरपाहून ) कुमारा, त्वरा कर, त्वरा कर. चल येथून लवकर. समुद्रास भरती येण्याचा हा समय आहे.

**नायक—** ( ऐकून, ) खरातर्क केला त्वां.

शार्दूल विक्रीडित वृत्त.

लाटाजाऊनिउंचउंच फुठती, कीं पूर आला कढा;
साऱ्यापर्वतकंदरा[1] भतिरवें[2] पूर्णाकरी येवढा;
घोघोशब्दकरूनियां श्रुतिसही[4] त्रासाबहू देतसे,
जी मध्यें बहुशंख लोळति, अशीवेळाचही येतसे.

**मित्रावसु—** कुमार, ही आलीच, पहा, वेळा जवळ.

गीति.

भक्षितिलवंगवल्ली करिमकर[6], तयांचिया मुखोद्गारें.
झालें सुगंधि, शोभे रत्नद्युतिनेंहि सिंधुतट सारें.

तरचला. ह्या मार्गावर आतां पाणी येईल म्हणून हा समुद्रतीरचा मार्ग सोडून पर्वता जवळच्या मार्गानें जाऊं.

( दोघे पुढें जाऊन इकडे तिकडे पाहतात. )

**नायक— मित्रावसो,** पहा हीं **मलयाचलाचीं** शिखरें कशीं दिसतात तीं !

---

१ जीवर गवत उगवलें आहे अशी जमीन. २ स्वच्छ. ३ घरें ४ प्या-वयास. ५ खावयास. ६ सोबतीस.

१ गुहा. २ प्रतिध्वनीनें. ३ भरूनटाकी असा. ४ कानांस. ५ भरतीचें पाणी. ६ हत्ती-सुसरी. ७ श्वासोच्छ्वास किंवा ढेंकर.

मित्रा० कुमार, "नैवामी मलयाचलसानवः, नागानामस्थि-संघाताः खल्वेते ?

नाय० ( सोद्वेगं ) कष्टं कष्टं ! किन्निमित्तं पुनरिमे संघातमस्थ्यवः संजाताः ?

मित्रा० नैवामी संघातभृत्यवः. कुमार, श्रूयतां यथैतत्परा किल स्वपक्षपवनापास्तसमस्तसागरजलस्तरसा रसातला दुधृत्योत्धृत्य भुजंगाननुदिनं समाहारयतिस्म वैनतेयः.

नायकः ( सोद्वेगं ) कष्ट मतिदुष्करं कर्म करोत्यसौ ! तत स्ततः ?

मित्रा० ततः सकल नागलोक विनाशशंकिना नागराजेन वासुकिना गरुत्मानभिहितः;

नाय० ( सादरं ) किमभिहितो वासुकिना गरुडः, यत्प्रथमंमां भक्षयेति. ?

मित्रा० नहि, नहि.

नाय० किमन्यदुक्तं ?

मित्रा० इदमभिहितं. गरुत्मन्, त्वदभिपात संत्रासात् सहस्रशः स्रवंति भुजंगमांगनानां गर्भाः; शिशवश्च पंचत्वमुपयांति. एवं संततिविच्छेदादस्माकं भवतश्च स्वार्थहानिः. तदिदम

गीति

शारद धवलपयोधर **मलयाचल** सानुवरि पहा वसती;
जाणों **हिमालयाचीं** शिखरें आच्छादिलीं हिमें दिसती.

**मित्राव०**— कुमारा, हीं **मलयाचलाचीं** शिखरें नव्हत. हे सर्पांच्या हाडांचे राशी पडले आहेत.

**नायक**— ( दुःखानें ) अरेरे फार वाईट गोष्ट ही ! कोणत्या कारणानें ह्यांवर संघातमृत्यु आले बरें ?

**मित्राव०**— कुमारा, हे संघात मृत्यु नव्हत. ऐक सांगतों. पूर्वी **गरुडपक्षी** आपल्या पक्षांच्या प्रचंड वायूनें समुद्राचें पाणी उडवून रसातलापासून बलात्कारानें सर्प काढून काढून रोज खात असे.

**नायक**— ( दुःखानें ) अरेरे, हें दुष्कर असून निर्दयपणाचें कर्म त्या **गरुडाचें** ! बरें मग पुढें काय झालें ?

**मित्राव०**— मग सकल सर्पांचा राजा **वासुकी** ह्यानें मनांत आणिलें कीं, अशानें सर्व नागलोकाचा संहार होईल. तेव्हां त्यानें **गरुडाशीं** बोलणें लाविलें.

**नायक**— हांहां काय बरें **वासुकीनें** बोलणें लाविलें ? मला अगोदर खा असें तो त्यास बोलला काय ?

**मित्राव०**— नाहीं नाहीं. असें नाहीं.

**नायक**— तर दुसरें काय बोलला ?

**मित्राव०**— तो असें बोलला कीं, हे **गरुडा**, पक्षिराजा, तुझ्या येण्याच्या भयानें हजारों नागस्त्रियांचे गर्भपात होतात. आणि हजारों बालकेंही मृत्युपंथास जातात. असें झालें असतां आमच्या सर्व कुळांचा उच्छेद होईल आणि तुझीही भक्ष्यहानि होईल. तर असें करूनको.

---

१ जेणेंकरून जीव समुदाय एकदम मरतात तो रोग. ( सांत )

मभिपतति पातालं भवान्, तदेकैकमनुदिनमहं समुद्रतट

स्थितस्य ते प्रेषयामि.

**नायकः**. कष्टं किल. एवंरक्षिता नागराजेन पन्नगाः

जिह्वासहस्रद्वितयस्य मध्ये नैकापि किंतादृगभूद्रसज्ञा ?

एषोहि रक्षार्थंनहिद्विषे या दत्तोमयाऽत्मेति तदाब्रवीति. ५

ततस्ततः

**मित्रा०** प्रतिपन्नं तत्सर्वं पक्षिराजेन.

इत्येकशः प्रतिदिनं विहितव्यवस्थो,

यान् भक्षयत्यहिपतो निह पक्षिराजः,

यास्यंति, यांतिच, गताश्च दिनै विवृद्धिं

तेषाममी तुहिनशैलरुचो स्थिकूटाः ६

त्यासाठीं तूं पाताळास येण्याचे श्रम घेतोस तें तुला येथें समुद्रतीरीं अनायासानेंच मिळेल अशी मी युक्ति योजिली आहे. ती कोणती म्हणशील तर, तुला रोज एक एक सर्प येथें पाठवून देत जाईन.

**नायक**— फार दुःखाची गोष्ट ही. ऐकून नागराजानें सर्व नागांचें रक्षण करण्याकरितां ही युक्ति काढली ! हरहर !

इंद्रवज्रावृत्त.

जिव्हा सहस्र द्वितयांमध्यें, का
तैशी रसज्ञा[1] नव्हतीच एका ?
कीं, सर्प रक्षार्थ अहिद्विषाला[2]
आत्मा दिला त्यां वदलीच बोला.

असो, मग पुढें कसें झालें ?

**मित्राव॰**— मग पक्षिराजानें नागराजावर विश्वास ठेवून त्याचें बोलणें मान्य केलें. तेव्हांपासून,

ओंव्या.

नित्यएकसर्पद्यावा; तेवढापक्षिराजेंभक्षावा;
मगउपद्रवनकरावा; कोणासर्पा. १
ऐसानियमझालियावरी, नागांमिउपद्रवगरुडनकरी
येऊनियेथेंसागरतीरीं निजभागसर्पनेतसे. २
तोधरुनिपदचंचूनीं, **मलयाद्रि**शिखरींबैसोनी,
निःशेषमांसरक्तभक्षोनी, अस्थींझुगारोनिदेतसे ३
त्याअस्थींचेहेपर्वतकेवळ, म्हणूनिदिसतीहेधवळ,
सहजचिभासतीहिमाचळ, पाहणारासीत्यांकडे ४

(१ जिव्हा. २ सर्प शत्रूस ) गरुडास )

**नायकः** ( साश्चर्यं )

सर्वाशुभनिधानस्य, कृतघ्नस्य, विनाशिनः,

शरीरकस्यापिकृते मूढाःपापानि कुर्वते । ७

कष्टमपर्यवसानेयं विपत्तिर्नागाना मापतिता !

( आत्मगतं ) अपि नाम शक्नोम्यहं स्वशरीर.

दानादेकस्यापि फणभृतः प्राणरक्षांकर्तुं ?

( ततः प्रविशति प्रतीहारः. )

**प्रतीहारः.** आरूढो गिरिशिखरं यावन्मित्रावसु मन्वेषयामि·

( विलोक्य ) अयं मित्रावसुः जामातुः समीपे तिष्ठति. तदुप·

सर्पामि. ( उपसृत्य प्रणम्यच ) विजयेतां कुमारौ !

**मित्रा०** सुनंद, किंनिमित्त मिहागमनंते ?

**प्रतीहारः** ( कर्णेशनैः शनैः कथयति )

**मित्रा०** कुमार, तातोमा माऽव्हयति.

**नायकः.** त्वरितं गम्यतां.

**मित्रा०** कुमारेणापि बहुप्रत्यवायेस्मिन्प्रदेशे कुतूहलिना न·

चिरं स्थातव्यं

ऐशीवर्ततांकालगती, अस्थिपर्वतपडलेक्षिती,
आणखीपुढेंहोतीलकिती, त्यांचीगणतीनकरवे१.

**नायक**— ( आश्चर्यकरून म्हणतो. )

गीति.

जेंसकलाअशुभांचेंघर• नश्वरआणिजेंकृतघ्नअती,
ऐशा तुच्छ शरीरासाठीं जन मूढ पाप आचरती.

अरेरे ! हें प्राणसंकट नागांवर मोठें पडलें ! ह्याला शेवट नाहीं. ( मनांत म्हणतो. ) असो, मी आपल्या शरीरदानानें एकातरी सर्पाचे प्राण रक्षीन, अशी मला संधि सांपडेल ?

( इतक्यांत प्रतीहार येतो. )

**प्रतीहार**— आतां मी पर्वताच्या माथ्यावर आलों. येथून **मित्रावसु** कोठें आहे तो हेरतों. ( अवलोकन करून, ) तो **मित्रावसु** जांवया जवळ उभा आहे. त्याच्या जवळ जातों. ( जवळ जाऊन प्रणामकरून ) उभयतां कुमारांचा जय असो.

**मित्राव०**— **सुनंदका,** इकडे कां आलास ?

**प्रतीहार**— ( त्याच्या कानाशीं लागून हळू हळू निरोप सांगतो. )

**मित्राव०**— कुमारा, तातानें मला बोलाविलें आहे. तिकडे गेलें पाहिजे.

**नायक**— तर त्वरित जावें.

**मित्राव०**— ह्या प्रदेशांत अडचणी फार आहेत ह्याकरितां वनशोभा पाहण्याच्या लोभानें आपणही फार वेळ येथें राहूंनये.

---

१ ज्याचा नाश कधीं होईल याचा विश्वास नाहीं.

( प्रतीहारेणसहनिष्क्रांतः )

**नाय०** ( विहस्य ) अस्माद्गिरिशिखरादवतीर्य समुद्रतटमवलोकयामि. ( परिक्रामन् ) नेपथ्ये ) हा पुत्त संखचूड कहं वावादिअमाणो किल मए अज्जतुमं पक्खिदव्वो ?

**नायकः.** ( समाकर्ण्य ) अये, योषितइवार्त प्रलाप स्तद्यावदुपसृत्य, केयं, कुतोवास्याः प्रतिभय मितिस्फुटीकरोमि. ( परिक्रामति )

ततः प्रविशति रुदत्या, वृद्धया, जनन्यानुगम्यमानः शंखचूडः, गोपायितवस्त्रयुगश्च किंकरः.

**वृद्धा०**( सास्रं ) हा पुत्तअ, संखचूड, कहं वावादिअमाणो किल अज्ज तुमंमए पेक्खिदव्वो ? ( चिबुके गृहीत्वा ) इमिणा मुहचंदेण दे विरहिदं मद्दस्स हिअअंअंधआरी भविस्सदि, पाआलंपि.

**शंखचूडः.** अंब, किमेवमति विक्लवतया सुतरां नः पीडयसि !

**वृद्धा.** ( चिरंनिर्वर्ण्य पुत्रस्यांगानि स्पृशती ) हा पुत्तअ कधं एदंदे अदिट्ठसुरकिरणं, सुकुमारं, शरीरकं निर्घृणो गरुडः आहारयिष्यति ! ( कंठे गृहीत्वा तारंरोदिति )

**शंखचू०** अंब, अलं परिदेवितेन. पश्य,

( असें बोलून प्रतीहारा बरोबर निघून जातो. )

**नायक**— ( हास्यकरून ) वाहवा काय चमत्कार हा ! आ-तां मी ह्या गिरिशिखरावरून उतरून समुद्रतटाची शोभा पाहतों. ( पुढें चालून जातो. )

( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो )

हापुत्रा शंखचूडा, तुझा वध होणार. आतां तुझा वध मी आपल्या डोळ्यानीं कसा पाहू.

**नायक** — ( तो शब्द श्रवणकरून ) अरे हा कोणातरी स्त्रीचा दुःखाचा शब्द दिसतो. तर जवळ जाऊन ती कोण, कुठली व तिला कोणापासून भय, हें समजून घेतलें पाहि-जे. ( पुढें जातो. )

( इतक्यांत पुढें शंखचूड, मागें रडतरडत म्हातारी स्त्री आणि काखेंत दोनवस्त्रें घेऊन एक चाकर असे येतात. )

**म्हातारी**— ( डोळ्यांत अश्रु आणून ) हापुत्रा, शंखचूडा; आतां तुझा वध होणार. तुझा वध मी आपल्या डोळ्यांनी कसारे पाहूं ! तुझें तोंड मला एकवेळ पाहूंदे. ( त्याचीहनुवटी धरून) हा तुझा मुखचंद्र मावळल्यावर माझें हृदय आणि पाताळही अंधकारानें भरून जाईल.

**शंखचूड** — आई कांबरें इतका शोक करून आपणाला आणि मला दुःखांत घालतेस. ?

**म्हातारी** — ( पुत्रमुखाकडे फारवेळ पाहून त्याच्या सर्वांगावर हात फिरविते. ) हा पुत्रका, हें तुझें सुकुमार शरीर. ज्यानें सूर्याचा कवडसा देखील पाहिला नाहीं, तें आज निर्दय **गरुड** खाणार ना ? ( गळ्याला मिठीमारून मो-ठ्यानें रडते. )

**शंखचूड** — आई, नको शोककरूं आतां. पहा.

क्रोडीकरोति प्रथमं, यदा जातमनित्यता,

धात्रीव जननी पश्चात्तदा शोकस्य कः क्रमः ? ८

वृद्धा. पुत्तअ, मुहूत्तअंपि चिठ, दाव वअणं दे पेक्खामि.

किंकरः. ( साक्षेपं ) एहि कुमार शंखचूड, एहि किं तुज्झ मादाए भणंतीए पुत्तसणेहमोहिदाए लाजकज्ज ण जाणादिएसा.

शंख॰ अय महमागच्छामि.

किंकरः. ( आत्मगतं ) आणीदोखु एसो मए वज्झसिलासमीवं. जाव एदं वज्झचिण्हं लत्तंसुअजुअलं देईअ वज्झसिलं देखेमि.

नाय॰ ( दृष्ट्वा ) अये इयमसौ योषित् ( शंखचूडं दृष्ट्वा ) नूनमनेनास्याः सुतेन भवितव्यं, यदर्थं माक्रंदति. ( समंतादवलोक्य ) नखलुकिंचिद्भयकारणं पश्यामि, कुतोस्याभयं भविष्यति ! किमुपसृत्य पृच्छामि ? अथवा प्रसक्त एवायमालापः; अतएव व्यक्तीभविष्यति. तद्विटपांतरितएव तावच्छृणोमि. ( तथा करोति )

किंकरः. ( कृतांजलिःसन् ) कुमार संखचूड, एसो सामिणो आदेसोत्ति कहिअ एरिसं णिट्ठुरं मंतीअदि.

शंख॰ भद्र, कथय.

किंकरः. णाअलोअसामी वासुई दे आणवेदि.

अनुष्टुप् छंद.

होतांच पदरीं ह्याच्या बांधिलीसे अनित्यता,
दाई प्रमाणें जननी पाळी, शोक किमर्थ हा ?

**ह्मातारी**०— बाळा, एक मुहूर्तभर तरी थांबरे; तुझें मुखकमल मला पोटभर पाहूंदे.

**चाकर** — ( दटावून ) चल चल कुमारा **शंखचूडा** ही तुझी आई पुत्रस्नेहानें मोहित होऊन तुला ऊगींच गुतविते. तिला घेऊन काय करतोस ? ती राजकार्य जाणत नाहीं.

**शंखचूड**— हा मी आलों पहा. रागें भरूंनको.

**चाकर** — ( मनांत म्ह० ) ह्याला मी वध्यशिळेजवळ आणिलें. आतां वधचिन्हाचीं वस्त्रें देऊन ह्यास वध्यशिळा दाखवितों.

**नायक** — अरे हीच ती स्त्री. ( **शंखचूडा** कडेपाहून ) हा तिचा पुत्र असावा. ह्याच्यासाठींच ही आक्रोश करिते असें वाटतें. ( आसमंतात् पाहून ) येथें भयाचें कारण तर कांहींच दिसत नाहीं. हिला भय कोणापासून होणार हें समजत नाहीं. असो. जवळ जाऊन तिलाच पुसावें म्हणजे समजेल. अथवा तिचें दुःखाचें भाषण चाललेंच आहे त्यावरून काय तें उघड होईलच, तर ह्या झाडाच्या आड उभें राहून काय तें ऐकावें. ( तसेंकरतो ).

**चाकर** — ( हातजोडून **शंखचूडा**पुढें उभाराहून म्ह० ) हे कुमारा **शंखचूडा**, स्वामीची आज्ञा म्हणून मी हें निष्ठुर बोलतों.

**शंखचू**० — बाबारे, सांग काय तें.

**चाकर** — नागलोकाचा स्वामी **वासुकी** ह्याची तुला आज्ञा आहे.

शंख० ( शिरस्यंजलिंकृत्वा ) किमाज्ञापयति स्वामी ?

किंकरः एदं रत्तंसुअजुअलं पलिहाय आरुह वज्झसिलं, जेण तुमं रत्तंसुअचिण्हो वलक्खिदं गलुडो गेण्हिअ आहालंकरेदि.

नाय० कष्टमयमसौ तपस्वी वासुकिना परित्यक्तोगरुत्मते आहाराय दत्तः !

किंकरः शंखचूड, गेण्ह एदं. ( वस्त्रयुगलमर्पयति )

शंखचूडः. ( सादर मुपनयेति गृहीत्वा ) गृहीतः शिरसि स्वाम्यादेशः.

वृद्धा. ( पुत्रहस्ते वाससी दृष्ट्वा सोरस्ताडनं ) हा पुत्तअ, पत्तअ, एदं खु तं वज्झसिलाचिण्हं पडिहाअ सा आरोही अदीत्ति ) मूर्छितापतति )

किंकरः. आसण्णा खु गउडस्स आगमणवेला. ता लहु अवक्कमेमि. ( किंकरो निष्क्रांतः )

शंख० अंब, समाश्वसिहि, समाश्वसिहि.

वृद्धा. ( समाश्वस्य उच्चैरोदिति. ) हा जाद, हा पुत्त, हा मणोरहसुतलद्ध, हाभत्त, हा विणअसाअर, कहिं दे उणईदिसं पुण्णमाचंदसरिछं मुहं पक्खिस्सं ? ( कंठेगृहीत्वा रोदिति. )

नायकः ( सास्रं ) अहो अतिनैर्घृण्यं गरुत्मतः ! अन्यच्च,

**शंखचू॰** — ( मस्तकावर अंजलि धरून म्ह॰ ) स्वामीची काय आज्ञा आहे ?

**चाकर** — हीं तांबडीं वस्त्रें परिधानकरून ह्या वध्यशिळेवर चढून बसावें. म्हणजे त्या चिन्हावरून आपलें भक्ष्य ये- थें आहे असें समजून पक्षिराज **गरुड** तुला घेऊन जाईल आणि आपला यथेष्ट आहार करील.

**नायक**— अरेरे फार दुःखाची गोष्ट आहे ही. हा बिचारा गरीब नागपुत्र **वासुकीनें गरुडाच्या** आहारा करितां येथें आणून टाकिला आहे वाटतें ?

**चाकर** — शंखचूडा, हें घे. ( असें म्हणून दोन तांबडीं वस्त्रें त्याला देण्याकरितां पुढें करतो. )

**शंखचूड** — ( आदरानें ) आण इकडे. ( असें म्हणून तीं व- स्त्रें घेऊन मस्तकावर ठेवितो. ) ही स्वामीची आज्ञा मीं शिरसा मान्य केली.

**म्हातारी** — ( पुत्राच्या हातांत तीं वस्त्रें पाहून ऊर बडविते ) हा बालका ! हा पुत्रका ! हीच कायरे वध्यशिला ? वध चिन्हाचीं हीं लालवस्त्रें नेसून ह्या वध्यशिळेवर तूं बसणार कायरे ? ( असें म्हणून मूर्छित पडते. )

**चाकर** — **गरुड** येण्याची वेळ जवळ आली. आतां आपण येथून जावें. ( असें म्हणून निघूनजातो. )

**शंखचू॰**— आई, सावध हो, सावध हो.

**म्हातारी**— ( सावध होऊन मोठ्यानें रडते. ) हा बाळा, हा पुत्रका, हा मनोरथफला, हा मातृभक्ता, हा विनयसागरा, पूर्णिमेच्या चंद्रासारखें असें तुझें मुख आतां मी कोठें पाहूं ? ( गळ्यास मिठी मारून रडते. )

**नायक**— ( डोळ्यांस पाणी आणून ) हाय हाय, काय **गरु- डाचा** निर्दयपणा हा !

मूढाया, मुहुरश्रुसंततिमुचः, कृत्वाप्रलापान्बहू
न्कस्त्राता तवपुत्रकेतिकृपणां दिक्षुक्षिपंत्यादृशं,
अंके मातुरुपागतं शिशुमिमं त्यक्त्वा घृणामश्नत,
श्चंचुर्नैव खगाधिपस्य, हृदयं वज्रेण मन्येकृतं. ९

शंख० ( दुःखातिशयान्मातुः हृदयस्फोटं शंकमानो मातरं मति )

यैरत्यंतदयापरैर्नविहिता वंध्यार्थिनां प्रार्थना,
यैःकारुण्यपरिग्रहान्न गणितः स्वार्थःपरार्थे मति,
येनित्यं परदुःखदुःखितधिय स्तेसाधवोस्तंगता,
मातः, संहरबाष्पवेग मधुना, कस्याग्रतो रुद्यते ? १०

( स्वहस्तेन मातुरश्रूणि मार्जयन् ) अंब, किमिति वैक्लव्यंते. मातः, समाश्वसिहि, समाश्वसिहि.

वृद्धा. ( सास्रं ) पुत्तअ, कहं समस्ससि दव्वं ? किं एक्को एसो पुत्तओति कदुअ जादाणुकंपेण णणिव्वारिदो णाअराएण वासुइणा ? हा किंदंतहतअ कधं दाणिं णिग्घिण. हिअअ. एव्वं वित्तिण्णेजीअलो अम्मिमह, पुत्तओ नविसुमरिदो ? सव्वहा हदम्हि मंदभाइणी !

शार्दूल विक्रीडितवृत्त.

जी मूढा, करिते विलाप बहु, जी अश्रू सदा गाळिते,
त्राता[2] कोण तुला मुला म्हणुन जी दाही दिशा लक्षिते,
अंकापासुनि[3] बाळ त्या जननिच्या नेऊनि भक्षीतसे,
त्याची चोंच[*] न वाटतें ह्रदयही वज्रेंचि केलें असे.

**शंखचू०**— ( दुःखातिशयानें मातेचें ह्रदय फुटेल कीं काय नकळे अशी शंका मनांत आणून )

शार्दूल विक्रीडित वृत्त.

ज्यांनीं होउंदिली कधींन विफला दीनार्थिंची याचना,
कारुण्येंकरुनी जिहीं न गणिलें स्वार्था, परार्थाविना,
गेले, जे परदुःखदुःखित सदा, ते साधु अस्तामती,
माते, आंवर शोकवेग; रडसी कोणापुढें संप्रती[1] ?

( आपल्या हातांनीं मातेचे अश्रू पुसून म्ह० )

आई, किती सांगावें ? काय दुःख हें तुझें ! आई, सावध हो, आई, अमळ स्वस्थ होगे. किती तरी शोक करितेस हा ?

**म्हातारी**— ( डोळ्यांत अश्रू आणून ) बाळा, कशीरे स्वस्थ होऊं ? अरे, मला एकच पुत्र. हें नागराज **वासुकी** ह्यानें मनांत आणून मजवर दया करावी, पण नाहीं केली. हा निर्दया **कृतांता** ! अरें तूं ह्या समयीं कसा पाषाणह्रदय झालास. हा जीवलोक एवढा विस्तीर्ण असतां माझ्या पुत्राची विस्मृति तुला कशी नाहीं पडली ? हायहाय, कशी मी सर्वप्रकारें मंदभाग्य झालें ! ( असें म्हणून पुन्हा मूर्छित होते. )

**नायक**— ( मनांत म्हणतो. )

---

* केवळ चोंचवज्राची असें नाहीं. ह्रदय वज्राचें म्ह० अतिकठिण असा अर्थ. ( दुःखानें ) बेहावलेली. २ रक्षक. ३ मांडीवरून. १ सांप्रत

( पुनर्मूर्च्छति )

नाय०

आर्त्तं, कंठगतप्राणं, परित्यक्तं स्वबांधवैः,

त्राये नैनं यदि, तदा कः शरीरेण मे गुणः ? ११

( तद्यावदुपसर्पामि. )

शंख० अंब, स्तंभयात्मानं.

वृद्धा. हा पुत्तअ, संखचूड, जदादाव णाअलोअपरिरक्खकेण वासुइणा सअंजेव्व पीडिदा, तदाको परिताअदि ? जेण हं समस्ससामि.

नाय० ( सत्वर मुपसृत्य ) नन्वहमहं.

वृद्धा. ( ससंभ्रमं गरुडभ्रांत्या स्वोत्तरीयेण पुत्रमाच्छादयंती नायकमुपसृत्य ) विणआणंदण, पढमं मं खादेहि. अज्ज अहं देणिमित्तं परिकप्पिदा वासुइणा.

नाय० ( सबाष्पं ) अहो पुत्रवात्सल्यं !

अस्याविलोक्य मन्ये, पुत्रस्नेहेन विक्लवत्वमिदं,

अकरुणहृदयः करुणां कुर्वीत भुजंगशत्रुरपि. १२

शंख० अंब, अलं अलं त्रासेन. नखल्वयं नागशत्रुः, पश्य

महाहिमस्तिष्कविभेदमुक्त

रक्तच्छटाचर्चितचंडचंचुः

गीति.

पडला प्राणव्यसनीं जो, केला त्याग बंधुनीं ज्याचा,
त्यादीनाचें रक्षण नकरी, तो देह काय कामाचा !

तर आतां जवळ जावें हें बरें.

**शंखचू०**— आई, अंमळ धीरधर.

**झातारी**— हा पुत्रा **शंखचूडा**, ज्या अर्थीं आम्हां नागांचें पाळण करणारा जो **वासुकी** त्यानेंच मजवर शस्त्र धरिलें, त्याअर्थीं आतां माझा त्राता कोण आहे, कीं ज्या मुळें मी धीर धरूं?

**नायक**— ( सत्वर जवळ जाऊन ) आहें आहें. मी आहें.

**झातारी**— ( घाबरून आपल्या पदरानें पुत्रास झांकित. आणि **गरुड**भ्रांतीनें नायकास उद्देशून म्ह० ) **हे विनतानंदना** पक्षिराजा; अगोदर मला खा. बापा, तुझ्या आहारार्थ **वासुकीनें** आज माझी योजना केली आहे.

**नायक**— ( डोळ्यांस पाणी आणून ) काय हा पुत्राचा मोह विलक्षण ! मला वाटतें—

गीति.

ही पुत्रस्नेहें जो करिते आक्रोश दीन होऊन,
त्यातें अकरुणह्रदयहि भुजंग शत्रु द्रवेल ऐकून.

**शंखचूड**— आई थांब थांब. भिऊं नको. आगे हा नाग शत्रु नव्हे. हा कोणी साधुपुरुष आहे. पहा.
पहा.

इंद्रवज्रा वृत्त.

ज्याची करी छिन्न भुजंग गात्रें
चंचू, जयाचीं अतिरक्त नेत्रें,

क्वासौ गरुत्मान् क्वचनाम सौम्यः
सत्वस्वभावाकृतिरेष साधुः ॥ १३ ॥

वृद्धा. पुत्तअहं खु तुज्झमरणभअभीदा सव्वं जीअलोअं गउडमअं पेक्खामि.

नाय० अंब माभैषीः नन्वहं विद्याधर स्तव पुत्ररक्षणार्थं मेवागतः अतस्त्वं धीरा भव.

वृद्धा ( सहर्षं ) पुत्तअ पुणोवि एदाइँ अक्खराइं भण.

नाय० किमनेन पुनःपुनरभिहितेन ? कर्मणैव संपादयिष्यामि.

वृद्धा. ( शिरस्यंजलिंबध्वा ) पुत्तअ, चिरंजीव.

नाय० मातः

ममैतदेवार्पय वध्यचिन्हं, प्रावृत्य तद्वै विनतासुताय,
पुत्रस्य ते जीवितरक्षणार्थं, स्वदेह माहारयितुं ददामि १४

वृद्धा. ( कर्णौपिधाय ) पडिहदं ममंगलं. जाद, तुमं संखचूडसरिच्छोज्जेव पुत्तओ, अहवा संखचूडाओ अहिओ, जो एव्वं बंधुजणपरिच्चत्तं, मे पुत्तअं णिअसरीरदाणेण परिरक्खिदुं मिच्छदि.

शंख० ( सविषादं ) अहो जगद्विपरीतमस्य महासत्वस्यचेतः !
कुतः

ऐसा विहंगाधिप उग्र कोठें ?
सौम्याकृती सात्विक साधु कोठें ?

**म्हातारी** — पुत्रा, खरें काय रे ? अरे, मी तुझ्या मरण भीतीनें सर्व जीवलोक गरुडमयच पाहतें.

**नायक** – माते, भिऊं नको. मी **गरुड** नव्हे. मी विद्याधर आहें. तुझ्या पुत्राचें रक्षण करण्यासाठींच मी आलों आहें. ह्यासाठीं तूं धीर धर. स्वस्थ हो.

**म्हातारी** — ( हर्ष पावून ) पुत्रा, हीं अक्षरें पुन्हा एकवेळ बोल. मला नीट ऐकूं दे.

**नायक** — माते, वारंवार बोलून दाखविण्यांत काय आहे ! आतां करूनच दाखवितों.

**म्हातारी** — ( मस्तकावर हात ठेवून, ) पुत्रा, तुला उदंड आयुष्य असो.

**नायक** — माते, आतां असें कर.

इंद्रवज्रा वृत्त.

तें दे मला सत्वर वध्य चिन्ह,
लेवूनियां मी बसतों अखिन्न,
रक्षावयाला प्रियपुत्र तूझा,
नागारिला देइन देह माझा.

**म्हातारी** — ( कानावर हात ठेवून, ) शिव शिव पुत्रा, काय हें बोललास ! अरे तूं **शंखचूडा** सारखाच मला प्रिय आहेस. अथवा **शंखचूडा**हून अधिक आहेस. कांकीं, बंधुजनानीं ज्याचा त्याग केला, तो हा माझा पुत्र तूं आपल्या शरीरदानानें रक्षावयास इच्छितोस ?

**शंखचू०** — ( दुःखित होऊन म्ह० ( अहो, या महापुरुषाचें धारिष्ट लोकोत्तर आहे !

विश्वामित्रः श्वमांसं श्वपचइव पुरा भक्षयद्यन्निमित्तं,

नाडीजंघो निजघ्ने कृततदुपकृतिर्यत्कृते गौतमेन,

पुत्रोयं कश्यपस्य प्रतिदिनमुरगानत्तितार्क्ष्यो यदर्थे,

प्राणांस्तानेव, चित्रं, तृणमिव कृपया यःपरार्थे जहाति ।१५

( नायकमुद्दिश्य ) भो महात्मन्, दर्शिता त्वयेयमात्मप्राण प्रदानव्यवसायनिर्व्याजा मयि दयालुता. तदलमनेन निर्बंधेन.

पश्य . उत्पद्यंते म्रियंतेच मादृशाः क्षुद्रजंतवः;

परार्थेदत्तदेहानां त्वादृशामुद्भवः कुतः ? १६

ततःकिमनेन ते मरणाग्रहेण ? प्रसीद मुच्यतामयमध्य वसायः.

नाय० ( शंखचूडं करे गृहीत्वा ) कुमार शंखचूड, नमे चिरा लब्धावसरस्यास्य यथार्थसंपादितमनोरथस्यांतरायं कर्त्तु- मर्हसि. ( पादयोः पतित्वा ) तदलंविकल्पेन. दीयतां मे वध्यचिन्हं.

ओंव्या.

प्राचीनकाळीं विश्वामित्रें श्वपचापरी मेलेलें कुत्रें
भक्षिलें त्या अतिपवित्रें प्राणरक्षणा कारणें; १
जरी आपल्याकामाआला, तरी गौतमानें मारिला
नाडीजंघनामाबहिला प्राण रक्षाणा साठींच; २
तैसाच हा विनता नंदन, सर्पजरी त्याचे स्वजन*
तरी त्यांचें करी कदन प्राणरक्षण व्हावया. ३
जे ऐसे आवडते प्राण, ते तृणाहून तुच्छ मानून,
परार्थ देतसे टाकून हा दयाळू आश्चर्य हें ४

(नायकास उद्देशून म्ह०) हे महापुरुषा, त्वांही आपल्या प्राणदानाच्या निश्चयानें आपला स्वभावसिद्ध दयाळुपणा माझेठायीं दाखविला. आतां हा आग्रह सोडून दे. कांकीं,

गीती.

मत्सम होती, मरती कोणकरी क्षुद्र जंतुंची गणती
त्वत्सम परार्थ निजतनु दातादुर्लभ असें कवी म्हणती

ह्यासाठीं कशाला आग्रह करतोस? तर आतां कृपाकरून हा मरणाचा आग्रह सोडून दे.

**नायक** — (शंखचूडाचा हात धरून) हे शंखचूडा, हा चिरकालेंकरून माझा मनोरथ सफल होण्याचा समय आला आहे. ह्याला तूं विसरूं नको. तुझ्या पायां पडतों. तूं मनांत कांहीं विकल्प न आणितां वध्यचिन्ह माझ्या स्वाधीन कर.

---

* कश्यप ऋषीस विनता नामक स्त्रीचे ठायीं गरुड हा पुत्र झाला, व दुसरी कद्रू म्हणून त्याची स्त्री होती तीपासून सर्प झाले अशी भारतांत कथा आहे. यावरून सर्प गरुडाचे स्वजन म्हणजे भाऊ होत.

शंख० भो महात्मन्, हे साहसिकाग्रणीः किंवृथा मयासेन ?

नखलु शंखचूडः शंखधवलं शंखपालकुलं मलिनीकरोति.

अथानुकंपनीया वयं, तदियमस्मद्विपत्तिविक्लवांबा यथा

न परित्यजति जीवितं तथाभ्युपायश्चित्यतां.

नाय० किमत्र चिंत्यते ? ननुचिंतितएवोपायःसच त्वदायत्तः

शंख० कइव ?

नाय०

म्रियते म्रियमाणेच, त्वयि जीवति जीवति;

यदि वांछसि जीवंतीं, रक्षात्मानं ममासुभिः १६

अयमेवाभ्युपायस्तदर्पय वध्यचिन्हं. यावदनेनात्मान

माच्छाद्य वध्यशिलामारोहामि. त्वमपि जननींपुरस्कृत्यास्मा

देवमदेशान्निवर्तस्व. कदाचिदियमालोक्यैव सन्निकृष्ट माघा-

तस्थानं स्त्रीस्वभावकातरतया प्राणान् जह्यात्. किंच न

पश्यसित्व मिदं विपन्नपन्नगानामनेककंकालसंकुलं महा

श्मशानं ?

चंचच्चंचूधृतार्धच्युतपिशितलवग्राससंबद्धलक्षै,

गृध्रैराविद्धपक्षद्वितयविधुतिभिर्बध्ध सांद्रांधकारैः

**शंखचू०** — हे महात्म्या, हे साहसिकाग्रणी, हा व्यर्थ मयास कशाला करतोस ? अरे हा **शंखचूड** शंखासारखें शुभ्र जें **शंखपालाचें** कुल त्याला डाग लावील काय ? आतां येवढीच कृपा करावी कीं, माझ्या मरणानें दुःखित झालेली ही माझी वृद्ध माता जेणें करून प्राणत्याग न करील असा कांहीं उपाय योजावा.

**नायक** — नवा उपाय योजावयाचा आहे ? योजलेलाच आहे. पण तो तुझ्या स्वाधीन आहे.

**शंखचू०** — तो कसा बरें ?

**नायक** — सांगतों. ऐक.

गीती.

तूंजगल्यास, जगेही, मेल्या सोडील आपुले प्राण.
इच्छिशि हिला, तरिकरीं मत्प्राणांनींच आपुलें त्राण.

हाच मुख्य उपाय आहे. ह्यासाठीं मी म्हणतों कीं, तें वध्यचिन्ह मजकडे दे. त्यानें मी आपणास आच्छादून घेऊन वध्य शिळेवर जाऊन बसतों. आणि तूंही आपल्या आईला घेऊन लौकर ह्यास्थळापासून निघून जा. नाहीं तर ही तुझी आई स्त्रीस्वभावामुळें ह्या जवळच्या वध स्थानास पाहूनच भयानें आपले प्राण सोडील. आणखी तूं पाहत नाहींस काय ? कीं, मेलेल्या सर्पांच्या अस्थींनीं भरलेलें हें श्मशान कसें भयंकर दिसत आहे तें ?

ओंव्या

मांस खाऊन माजल्या घारी, चोंचींत धरूनि जातीदुरी,
सुटोनि पडती भूमीवरी, मांस खंडें, आंतडीं १
घिरट्या घालीत वर उडती, एक मेकांशीं झटती,
त्यांच्या छाया खालीं पडती, मेघछाया सारिख्या २

यत्रोद्दामंभ्रमंन्यःस्थगितशिखिशिखाः श्रेणयोस्मिश्छिवाना

मस्लस्रोतस्यजस्रं स्रुतबहुलवसावासमिश्रेस्वनंति १७

**शंख०** कथं नपश्यामि ?

प्रतिदिनमशून्यमहिना

हारेण, विनायकाहितभीति,

शशिधवलास्थिकपालं

वपुरिवरौद्रं स्मशानमिदं. १८

तद्गच्छ. किमेभिस्त्रासोपन्यासैः। आसन्नः खलु गरुडागमनस

मयः ( मातुरग्रतोजानुभ्यां स्थित्वाशिरोनिहितांजलिः ) अंब,

त्वमपिनिवर्तस्वेदानीं.

समुत्पत्स्यामहे मातर्यस्यां यस्यां गतौ वयं,

तस्यां तस्यां प्रियसुता माता भूयास्त्वमेवनः १९

( पादयोः पतति )

**वृद्धा.** ( सास्रं ) हा ! कधं अवच्छिमंसे वअणं ! पुत्तअ, ण क्खु

तुमं उज्झिअ अण्णदो मेपाआ वहंति ताअहंपि तुए ज्जेव

सह मरिस्सं.

**शंख०** ( उत्थाय ) यावदहमपि अस्मादुत्तरेणादूरे भगवंतं द-

वाहती रक्ताचे पाट, मांसवसांचा चिखल दाट,
त्यामध्यें भालूंच थाट, ओरडती चोहीं कडे. ३
ऐसें हें भयंकरस्थान, मृतसर्पाचें होय श्मशान,
पाहतां खचावें अवसान सर्पाचें येथें. ४

**शंखचू॰** — नाहीं कसें ? मी पाहतच आहें.

गीति.

*प्रतिदिन अशून्य अहिनीं, विनायकप्रीतिदायि, नित्य असे,
शशिधवलास्थिकपाला धरि रौद्रवपू तसें श्मशान दिसे २

असो ह्या त्रासदायक गोष्टी कशाला पाहिजेत ? तर आतां तूं जा येथून. गरुड येण्याचा समय जवळ आला आहे. ( मातेच्या पुढें गुडघे टेंकून मस्तकीं अंजली धरून म्ह॰ ) आई, आतां तूंही पण जा येथून लवकर.

गीति.

ज्याज्या योनींत मला, मति, देईल जन्म हा धाता,
त्यात्या योनींत मिळो तुज ऐशी पुत्रवत्सला माता.

( असें म्हणून तिच्या पायांवर डोकी ठेवितो. )

**म्हातारी** — कसें रे हें तुझें विपरीत भाषण ! पुत्रा तुला टाकून दुसरीकडे जावयास माझे पाय वाहत नाहींत, तर मी ही तुझ्या बरोबर मरेन.

**शंखचू॰** — ( उठून ) असो आतां मी तर. उत्तरेकडे जवळच

* या पद्यांतील विशेषणें रौद्रवपु म्हणजे शिवाचें शरीर व श्मशान या दोहोंकडे लागतात. अहिनीं म्हणजे सर्पांनीं युक्त शिवशरीर असतें व श्मशान ही तसेंच आहे; कारण बळी होण्याकरतां सर्प तेथें असतात. शिवशरीर विनायकास गणपतीस प्रीति करतें; व श्मशान, विनायक म्हणजे पक्षिनायक गरुड यास प्रीति करतें. शशी- चंद्र आणि धवल पांढरीं अस्थिकपाळें यांचें धारण शिव शरीर करतें, व श्मशान चंद्राप्रमाणें पांढरीं अस्थिकपाळें- हाडाच्या कवट्या धारण करतें. १ महादेव

क्षिणगेोकर्णं मदक्षिणीकृत्य स्वाम्यादेश मनुतिष्ठामि.

( मात्रासह निष्क्रांतः )

**नायकः** मे संपन्न मभिलषितं. तत्कोनामाभ्युपायः !

( ततः प्रविशति सद्वासमा कंचुकी )

**कंचुकी.** इदं रक्तांशुकयुगलं देव्यामित्रावसुजनन्या प्रेषितं. तदे तत्परिधत्तां कुमारः

**नायकः.** ( दृष्ट्वा सहर्ष मात्मगतं. ) दिष्ट्यासंपन्नमभिलषित मनेनोपनतेनायाचितेन रक्तांशुकयुगलेन. ( प्रकाशं ) कंचुकिन्नुपनय.

**कंचु॰** ( रक्तवसनद्वयमर्पयति )

**नाय॰** ( गृहीत्वा परिधाय स्वगतं ) सफलीभूतोमलयवत्याः पाणिग्रहः ( प्रकाशं ) कंचुकिन् गम्यतां मद्वचनात्त्वयाभि वादनीया देवी.

**कंचु॰** यदाज्ञापयति कुमारः ( इति निष्क्रांतः )

**नाय॰**

वासो युग मिदंरक्तं प्राप्तेकाले समागतं
करोति महतीं प्रीतिं परार्थैकदशो मम २०

( दिशोविलोक्य ) यथाचायं चलितमलयाचलशिलाचयः प्रचंडो, नभस्वान्, तथा तर्कयामि, आसन्नीभूतः पक्षिराजः तथाहि,

तुल्यं संवर्तकाभ्रैर्विदधति गगनं पंक्तयःपक्षतीनां,

दक्षिण गोकर्ण आहे. त्यास प्रदक्षिणा करून स्वामीची आज्ञा शेवटास नेतों. ( असें म्हणून मातिसहवर्तमान निघून जातो. )

**नायक—** माझ्या जें मनांत होतें तेंतर होण्याचा समय आहे, पण आतां कोणता उपाय करावा ?

( इतक्यांत अकस्मात कंचुकी येतो. )

**कंचुकी—** (जवळ जाऊन, ) हे कुमारा, देवी **मित्रावसूची** जननी हिनें हीं दोन तांबडीं वस्त्रें तुजकरितां मजबरोबर पाठविलीं आहेत. हीं घ्यावीं आणि नेसावीं.

**नायक—** ( पाहून हर्ष पावतो, आणि मनांत म्ह० ) वाहवा न मागतां हीं रक्तवस्त्रें मजकडे आलीं. येणेंकरून माझें इच्छित पूर्ण झालें. हें मोठेंच दैव. ( उघडपणें ) हे कंचुकी, आणलीं वस्त्रें मजकडे.

**कंचुकी,** ( दोन्ही रक्त वस्त्रें नायकास देतो. )

**नायक—** ( तीं वस्त्रें घेऊन एक नेसतो आणि एक पांघरतो. ) ( मनांत म्ह० ) **मलयवतीचें** पाणिग्रहण जें म्यां केलें तें आज सफळ झालें. ( उघडपणें ) हे कंचुकी, आतां तुवां जावें. आणि देवीला माझा फार फार प्रणाम सांगावा.

**कंचुकी—** आज्ञा कुमाराची. ( असें म्हणून निघून जातो,

**नायक—** ( मनांत म्ह० ) वाहवा !

गीति.

हीं दोन रक्तवस्त्रें योग्या समयांत मजकडे आलीं,
परहित करण्या मजला अतिशयित प्रीति अर्पितीं झालीं,

( चोहोंकडे पाहून ) अहो, ज्यापक्षीं **मलयाचलाचीं** शिखरें हालविणारा असा प्रचंड वारा सुटला आहे, त्यापक्षीं असा तर्क होतो कीं, पक्षिराजाचें आगमन झालें. पहा.

स्रग्धरा वृत्त.

कल्पांतीं मेघ तैशा गगनिं पसरल्या पक्षपंक्ती जयाच्या,

तीरे वेलानिलौतः क्षिपति भुवइव प्लावनायांबुराशेः
कुर्वन्कल्पांतशंकां सपदिच सभयं वीक्षितो दिग्द्विपेंद्रैः
देहोद्योतैर्दशाशाःकपिशयति,मुहुर्द्वादशार्काभदीप्तिः २०

तद्यावदसौ नागच्छत्येव शंखचूड, स्तावत्त्वरिततरमिमां वध्यशिलामारोहामि. ( तथाकरोति. संविश्य शिलास्पर्शं नाटयति ) अहो !. स्पर्शोयमस्याः

न तथा सुखयति, मन्ये, मलयवती मलयचंदनैः सार्द्रा,
अभिवांछितार्थसिद्ध्यै वध्यशिलेयं यथाश्लिष्टा २२

अथ किंमलयवत्या ?

शयितेन मातुरंके विस्रब्धं शैशवेन य त्प्राप्तं,
लब्धं सुखं मयास्या वध्यशिलायास्तदुत्संगे २३

तदयमागतो गरुत्मान्, यावदात्मान माच्छाद्य तिष्ठामि ( तथा करोति )

( ततः प्रविशति गरुडः. )

गरुडः

क्षिप्त्वा बिंबं हिमांशोर्भयकृतवलयं संहरच्छेष मूर्तिं,
सानंदंस्यंदनाश्वग्रसनविगलितेपूष्णि दृष्टोग्रजेन,
एष प्रांतापसर्पज्जलधरपटलव्यायतीभूतपक्षः,
प्राप्तो वेगान्महीध्रंमलयमहमहिग्रासगृध्नुः क्षणेन २४

नाय०

संरक्षतापन्नगमद्यपुण्यं
यथार्जितंयत्स्वशरीरदानात्,
भवेभवेतेनममैवभूया
त्परोपकारायशरीरलाभः २५

गरुडः ( नायकं निर्वर्ण्य )

जाणो मज्जावया भू उडवित पवनें वारि तें अंबुधीच्या,
जो दे कल्पांतशंका मनिं म्हणुनि भयें पाहिला दिग्गजांनीं,
देहाच्या कांतिनें जो कपिश करि दिशा द्वादशार्काभ, मानी.

तर आतां तो **शंखचूड** परत आला नाहीं तोंच लौकर जाऊन त्या वध्यशिळेवर बसावें ( तसें करतो. आणि खालीं बसून शिळेचा स्पर्श झालासें दाखवून ) वाहवा ! काय हो ह्या शिलातळाचा स्पर्श सुखदायक आहे हा !

गीति.

नाहीं सुखदेत तशी **मलयवती** मलय चंदनानें तें,
स्वमनोरथसिद्धिस्तव वध्यशिळाही मऊ जशी देते.

अथवा **मलयवती** राहूं द्या,

बाळपणीं मातेच्या अंकावर जें निजून न मिळालें,
तें सुख आज मला ह्या वध्यशिळेवर बसोनियां झालें,

असो हा **गरुड** आला. आतां मी आपणाला झांकून घेऊन बसतों. ( तसें करतो. )

( इतक्यांत **गरुड** येतो. )

**गरुड**— ( मनांत म्ह० )

स्रग्धरा वृत्त.

चंद्राचें बिंब गेलें उडुनि, पडवळें सर्प झाले भयानें,
सूर्याला धाक पोटीं पडुनि निरखिलों कौतुकें अग्रजानें,[1]
पक्षांनीं दूर केली जलधर[2] पटली, वेळ नाहींच याला,
वेगानें पावलों मी **मलय** गिरिशिरीं सर्प भक्षावयाला.

**नायक** — ( आपल्या मनांत म्हणतो. )

गीति.

निज देहें पन्नग मी रक्षुनि जें पुण्य जोडिलें, तेणें,
जन्मो जन्मीं ऐसा परोपकारार्थ देह मज होणें.

**गरुड** — ( नायका कडे पाहून म्ह० )

---

१ अग्रज म्हणजे वडील भाऊ. गरुडाचा वडील भाऊ अरुण जो सूर्याचें सारथ्य करतो. २ मेघ

अस्मिन्वध्यशिलातले निपतितं शेषानहीन्रक्षितुं
निर्भिद्याशनिदंडचंडतरया चंच्वाधुना वक्षसि
भोक्तुं भोगिन मुद्धरामि तरसा रक्तांबरमावृतं
दिग्धंयद्धृयदीर्यमाणहृदयप्रस्यंदिनेवासृजा २६

( अभिपत्य नायकं गृण्हाति. नेपथ्ये दुंदुभिध्वनिः पुष्प-वृष्टिश्च.

गरुडः ( सविस्मयं ) अये, दुंदुभिध्वनिः पुष्पवृष्टिश्च ? ( ऊर्ध्वमवलोक्याकर्ण्यच )

आमोदानंदितालिर्निपतति किमियं पुष्पवृष्टिर्नभस्तः ?
स्वर्गे किंचैषचक्रं मुखरयति दिशां दुंदुभीनां निनादः ,
( विहस्य )
आज्ञातं. सोपि, मन्ये, ममजवमरुता कंपितः पारिजातो,
मंद्रं संवर्तकाभ्रैरिदमपिरचितं जातसंहारशंकैः २७

नायकः. दिष्ट्या कृतार्थोस्मि !

गरुडः. ( नायकं कवलयन् )

नागानां रक्षिता भाति गुरुरेष तथा मम,
यथा सर्पाशनाकांक्षां व्यक्तं मद्यापनेष्यति. २८

तद्यावदेव मलयशिखर मारुह्य यथेष्ट मिम माहार याभि ( इति जीमूतवाहनं गृहीत्वा गरुडो निष्क्रांतः )

चतुर्थोंकः समाप्तः.

ओंव्या.

उरले सर्प रक्षावयाला, माझा आहार होऊन आला,
वध्य शिळेवर चढून बसला, तोह्राच नागनायक १
रक्त वस्त्रें आंग वेष्टिलें, जाणों मध्यें ल्हृदय फुटलें,
त्यापासून रक्त निघालें, त्यानें माखलें सर्वांग. २
वज्र साय चंचू करून, ह्याचें कोमल ल्हृदय फोडून,
भोजन करावया घेऊन, वेगें उडून जाईन मी ३

( असें म्हणून झडप घालून नायकास उचलतो. इतक्यांत पडद्या पलीकडून दुंदुभिध्वनि आणि पुष्पवृष्टि होते. )

**गरुड** — ( आश्चर्य करून ) अहो हा दुंदुभिध्वनि आणि ही पुष्पवृष्टि कशासाठीं ? ( वरपाहून आणि ऐकून म्ह० ) हां समजलों.

स्रग्धरावृत्त.

आमोदें[1] भृंगसंघा[2] सुखवित पडते पुष्प वृष्टी कशानें ?
स्वर्गी दिक्चक्र[3]झालें मुखरित[4] तरिकां दुंदुभीच्या स्वनानें ?
हां ! आतां ज्ञात झालें, मम जवमरुतें[5] कांपलों[6] पारिजात;
कल्पांता शंकुनीयां मलयधैनचि हे मंदसे गर्जतात.

**नायक** — वाहवा मी कृतार्थ झालों. माझें दैव चांगलें !

**गरुड** — ( नायकाला खावयास कवळितो. )

अनुष्टुप्.

नागांचा[7] रक्षिता, माझा गुरुही भासतो तसा,
माझी सर्पाशनाकांक्षा[8] आज दूरकरी असा.

तर आतां ह्या **मलयपर्वताच्या** शिखरावर बसून यथेष्ट आहार करीन.

( असें म्हणून **जीमूतवाहनास** घेऊन **गरुड** निघून जातो. )

चवथा अंक समाप्त.

---

१ सुवासानें. २ भुंग्याचे समुदाय. ३ दिशामंडळ. ४ शब्दायमान. ५ माझ्या पक्षांच्या प्रबळ वाऱ्यानें ६ कल्पतरु म्हणून पुष्पें पडलीं. ७ सर्पांचा. ८ सर्पभक्षणाची इच्छा.

( ततः प्रविशति सुनंदोनाम प्रतीहारः )

प्रतीहारः

स्वगृहोद्यानगतेपि स्निग्धेपापं विशंक्यते स्नेहात्,

किमुदृष्टबव्हपाये प्रतिभयकांतारमध्यस्थे ! १

तथाहि, जीमूतवाहनो जलधिवेलावलोकनकुतूहली नि-

ष्क्रांतश्चिरयतीतिदुःखमास्ते महाराजो विश्वावसुः; तत्समा-

दिष्टोस्मितेन, यथा सुनंद, श्रुतंमया सन्निहितगरुडप्रतिभय मु-

द्देशं जामाता जीमूतवाहनो गतइति शंकित एवास्मितेन वृत्तांतेन.

# अंक ५

## पात्रें.

सुनंद प्रतीहार. .. .. .. .. ..विश्वावसूचा द्वारपाल
जीमूतकेतु. .. .. .. .. .. .नायकाचा पिता.
वृद्धादेवी. .. .. .. .. .. ..जीमूतकेतूची स्त्री.
मलयवती. .. .. .. .. .. .. नायिका.
शंखचूड. .. .. .. .. .. .. .. सर्प.
गरुड. .. .. .. .. .. .. .. पक्षिराज.
नायक. .. .. .. .. .. .. .. जीमूतवाहन.
गौरी. .. .. .. .. .. .. .. जगदंबा.

प्रारंभ.

( तदनंतर सुनंदनामा प्रतीहार येतो. )

प्रतीहार — असें आहे,

गीति.

प्रियबागेंतहि जातां स्नेहें येतेंच वाइट मनांत;
मगकाय नये गेल्या वरितो दुर्गम भयांकर वनांत ?

आज तशीच गोष्ट झाली आहे. पहा, कीं, जीमूतवाहन समुद्रतीरची शोभा पहावयाच्या कौतुकानें तिकडे गेला. त्याला फार वेळ झाला. ह्यामुळें महाराज विश्वावसु हा मोठ्या काळजींत पडला आहे. त्यानें मला आज्ञा केली आहे कीं, अरे सुनंदा, मी असें ऐकतों कीं, ज्या ठिकाणीं गरुडाचें भय आहे त्याठिकाणीं जामाता जीमूतवाहन गेला आहे. तर ह्या गोष्टीनें मला मोठी चिंता

१ भयाची खाण

वत्त्वरितं विज्ञायागच्छ, किमसौ गृहमागतो नवेति. तद्यावदत्रग च्छामि. ( परिक्रामन्नग्रतोवलोक्य ) अये, अयमसौ राजर्षि जीमूतवाहनस्य पिता जीमूतकेतुरुटजांगणे सहधर्मचारिण्या राजपुत्र्या वध्वा चोपास्यमानस्तिष्ठति. तथाहि,

क्षौमे, भंगवती, तरंगितचलत्फेनांबुतुल्येवहन्,
जान्हव्येवविराजितः सवयसा देव्यामहापुण्यया,
धत्ते तोयनिधेरयं तुसदृशीं जीमूतकेतुःश्रियं,
यस्यैवांतिकवर्तिनी मलयवत्याभाति वेलायथा. २

तत्तावदुपसृत्य पृच्छामि.

( ततःप्रविशत्यासनस्थः पत्नीवधूसमेतो जीमूतकेतुः )

जीमूतकेतुः.

भुक्तानियौवनसुखानि, यशोविकीर्णं,
राज्येस्थितं, स्थिरधियाचरितं तपोभिः,
श्लाघ्यः सुतः, स्वसदृशान्वयजा स्नुषेयं,
चिंत्यो मयाननु कृतार्थतयैव मृत्युः ३

सुनंदः. ( सहसोपसृत्य ) जीमूतवाहनस्य.

जीमूतकेतुः. ( कर्णौपिधाय ) शांतं पापं, शांतंपापं !

देवी. पडिहदममंगलं !

प्राप्त झाली आहे. ह्यासाठीं तूं लवकर जाऊन तो घरीं आला कीं नाहीं हें पाहून ये. तर आतां मी तिकडे जातों. ( पुढें जाऊन, अग्र भागीं अवलोकून म्ह० ) अरे, हाच जीमूतवाहनाचा पिता राजर्षि जीमूतकेतु आपली धर्मपत्नी आणि सून मलयवती ह्यां सहवर्तमान आश्रमाच्या अंगणामध्यें बसला आहे, पहा.

शार्दूलविक्रीडित.

वस्त्रें जीर्ण वपूवरी शुचि धरी, फेनांबुशीं भासती,
संगें वागत जान्हवी सम दिसे देवी महार्हा सती.
शोभा अंबुधिचीच हा सुसदृशो जीमूतकेतू धरी,
ज्याच्या संनिधहो स्नुषा नयवती वर्ते सुवेला खरी २

तर आतां त्याच्या जवळ जाऊन त्यास विचारतों. ( इतक्यांत पत्नीस्नुषासहित जीमूतकेतु येतो आणि आसनावर बसतो. )

**जीमूतकेतु** — ( वैराग्य बुद्धीनें म्हणतो. )

पद.

झालोंमी कृतार्थ आतां, मृत्यूची वाट पाहतों. ( ध्रुवपद )
तारुण्यांत सुखाची गोडी, अनुभविली म्यां नाहीं थोडी,
उभारिली कीर्तीची गुढी, आतां तुच्छचि मानितों. २ ( झा० )
राज्य स्थिर बुद्धीनें केलें; वनांत राहुनि तप आचरिलें;
ध्यानें सच्चित्सुख अनुभविलें; आतां देह त्यागीतों. २ ( झा० )
श्लाघ्य सुताची मामी झाली; कुलीन कन्या सून मिळाली;
नाहीं इच्छा कांहीं उरली; आतां परलोका जातों. ३ ( झा० )

**सुनंद** — ( अकस्मात जवळ जाऊन म्हणतो. ) **जीमूतवाहनाच्या.**

**जीमूतके०**— ( कानावर हात ठेवून ) इडापिडा टळो.

**वृद्धा देवी**— अमंगळ पळो.

**मलयवती.** ( स्वगतं ) वेवेदे विअ हिअअं इमिणादुण्णि मित्तेण.

**जीमूतके॰** भद्र, किंतत् जीमूतवाहनस्य ?

**प्रतीहारः** जीमूतवाहनस्यवार्ता अन्वेषयितुं प्रेषितोस्मि युष्म दंतिकं महाराज विश्वावसुना. तदाज्ञापयतु महाराजः किमहं स्वामिने निवेदयामि ?

**जीमूतकेतुः.** किमसन्निहितस्तत्र मेपुत्रः ?

**प्रती॰** अथकिं ?

**वृद्धा.** ( सविषादं ) जई तहिं णत्थि ता कहिंगदो दाणिं भविस्सदि मेपुत्तओ, जेणएव्वं चिरअदि ?

**जीमूतके॰** नियत मस्मत्प्राणयात्रार्थं नितांतंदूरंगतो भविष्यति.

**मलयवती.** ( सविषादमात्मगतं ) अहं उण मुहुत्तंपि अज्ज उत्तंण पस्खंती अण्णं जेव्व कंपि आसंकेमि.

**सुनंदः.** आज्ञापयतु महाराजः किमया स्वामिने विज्ञापनीयं ?

**जीमूतकेतुः** ( वामाक्षिस्पंदनंसूचयन् ) जीमूतवाहनश्चिरयतीतिपर्याकुलोस्मिचेतसि.

स्फुरसिकिमुदक्षिणेक्षण, मुहुर्मुहुः कथयितुं ममानिष्टं ?
हतचक्षु, रपहतं ते स्फुरितं. ममपुत्रकः कुशली ? ४
अथच सूर्यांशुयोगोनाशुभं,

**मलयवती**— ( मनांत म्ह० ) ह्या अपशकुनानें माझें ह्रदय थरथर कांपतें.

**जीमू० के०**— बाबारे, **जीमूतवाहनाचें** काय म्हणालास ?

**सुनंद**— **जीमूतवाहनाच्या** शोधास महाराज **विश्वावसूनीं** मला आपणाकडे पाठविलें आहे. तर मला आपण आज्ञा करावी. मी आपल्या स्वामीला काय जाऊन सांगूं ?

**जीमूतके०**— तर माझा पुत्र **जीमूतवाहन** तेथें नाहीं काय ?

**सुनंद**— तेथें नाहींत ते महाराज.

**वृद्धा देवी**— (विषाद पावून ) जर तेथें नाहीं, तर माझा पुत्र ह्यासमयीं कोणीकडे गेला असावा बरें ? एवढा वेळ तो कोठें गुंतला असेल कोण जाणे.

**जीमूतके०**— खचित सांगतों. आम्हांला फळें मुळें आणावयाकरितां तो कोणीकडे तरी दूर गेला असेल.

**मलयवती**—( विषाद पावून मनांत म्ह० ) प्राणनाथ माझ्या दृष्टीस क्षणभर पडले नाहींत म्हणजे भलतेंच मनांत येऊं लागतें. कोण मेलें माझें द्वाडमन !

**सुनंद**— आज्ञा करावी महाराज कायतो. म्यां स्वामीला काय सांगावें ?

**जीमूतके०**— ( डावाडोळा लवलासेंकरून, ) **जीमूतवाहन** अजून येत नाहीं. डावाडोळा लवतो. ह्यावरून माझें अंतःकरण घाबरल्यासारखें होतें.

गीति.

**रे वामलोचना, तूं पुनः पुन्हा आज कां असा लवशी ?**
**आहे कुशली माझा पुत्र तरी काय अशुभ सूचविशी ?**
**आतां ह्या सूर्याच्या किरणांनीं सर्व अशुभाचा नाश**

( ऊर्ध्वमवलोक्य ) अयमेव त्रिभुवनैकचक्षुर्भगवान् सहस्रदीधितिः स्फुटं जीमूतवाहनस्य श्रेयः करिष्यति. ( अवलोक्य सविस्मयं )

आलोक्यमान मतिलोचन दुःखदायि,
रक्तच्छटा निजमरीचि-भुवोविमुंचत्,
उत्पातवाततरलीकृततारकाभ,
मेतत्पुरः पतति किं सहसा नभस्तः १५

कथं चरणयोरेवाग्रतो निपतितं !

( सर्वेविस्मयंरूपयंति )

**जीमूतके०** अये ! सरसमांसकेशचूडामणिः ! कस्य पुनरयं भविष्यति. ?

**वृद्धा.** ( सविषादं ) महाराअ, पुत्तअस्स विअएदं चूडारअणं.

**मलयवती.** ( अपवार्य ) माएवं भण.

**सुनंदः.** महाराज, मैवमविज्ञायैव विक्लवोभूः अत्रहि तार्क्ष्येण भक्ष्यमाणानां नागाधिपाना मनेकशोनखमुखोत्खाताः पतंत्येव शिखामणयः

**जीमूतकेतुः** देवि, सोपपत्तिकमभिहितमेतत्सुनंदेन. कदाचिदेव मपिस्यात्.

**वृद्धा—** सुनंद, गच्छ, कदावि, एत्तिआए वेलाए ससुरघरं जे-

होवो. (वरपाहून) ह्राच त्रिभुवनैकचक्षु भगवान् सहस्ररश्मी **जीमूतवाहनाचें** कल्याण करो. (पाहून विस्मित होतो.)

दिंड्या.

पाहतां जें नेत्रांस दुःख देतें,
रक्तरंगाची छटा टाकिजेतें,
नभापासुन नक्षत्र जणों झडलें,
काय माझ्या येऊन पुढें पडलें ?
काय चरणांच्याच अग्रभागीं पडलें !
(सर्व विस्मयानें पाहतात.)

**जीमूतके०** — (पाहून) अरे, हा रक्तमांस यांनीं भरलेला चूडामणि[1] दिसतो ! हा कोणाचा असेल बरें ?

**वृद्धादेवी** — (विषाद पावून) महाराज, तुम्हीं कांहीं म्हणा, पण हा माझ्या पुत्राचाच चूडामणि आहे.

**मलय०** — (एकीकडे तोंडकरून,) सासूबाई; असें नकाहो म्हणूं. द्वाडवाणी.

**सुनंद** — महाराज, पुरतें समजल्या शिवाय उगीच दुःखांत आपणास घालतां हें काय ? अहो ह्या ठिकाणीं नेहमीं भुजंगांचें भक्षण **गरुड** करीत असतो. त्या भुजंगांचे चूडामणि येथें पडत असतात. तसा एखाद्या नागराजाचा हा चूडामणि **गरुडानें** तीक्ष्ण नखांनीं कुरतुडून टाकिला, तो येथें पडला असेल.

**जीमूतकेतु** — हेदेवी, सुनंद सयुक्तिक बोलला. तसेंही कदाचित् असेल.

**वृद्धादेवी** — अरे **सुनंदा**, जाजा लवकर तूं. इतक्या वेळांत कदाचित् माझा पुत्र सासुरवाडीस आला असेल.

---

[1] डोक्यांतलें भूषण.

व्व आअदो भविस्सदि मे पुत्तो. तदो गच्छ तुमं जाणिअ लहु संपादेहि.

**सुनंदः.** यदाज्ञापयति देवीति. ( निष्क्रांतः )

**जीमूतके०** देवि अपिनाम, नागचूडामणिरयंस्यात् ?

( ततः प्रविशति रक्तवस्त्रसंवृतः शंखचूडः )

**शंखचूडः—** ( सास्रं ) कष्टं भोःकष्टं ! मुषितोस्मि दैवेन

गोकर्ण मर्णवतटे त्वरितं प्रणम्य,
प्राप्तोस्मि तां खलु भुजंगमवध्यभूमिं,
आदाय तं नखमुखक्षतवक्षसंच
विद्याधरं गगनमुत्पतितोगरुत्मान्.

हा निष्कारणबांधव, हा परमकारुणिक, हा परदुःखदुःखित, हा विपद्वारिनिधिपतितजनोद्धरणपोत, हा परोपकारतृणीकृतदत्तदेह, क्कनु खलुगतोसि ? प्रयच्छमे प्रियवचनं ( आत्मानमुद्दिश्य ) हा हा हतोस्मि मंदभाग्यः ! आः शंखचूड, हतक, किंत्वयाकृतं ?

नाहित्राणात्कीर्तिरन्यामयाप्ता,
नापि श्लाघ्या स्वामिनोनुष्ठिताज्ञा,
दत्वात्मानं रक्षितोऽन्येनशोच्यो,
हा धिक् कष्टं तेनवा वंचितोस्मि ! ७

तत्राहमेवंविधः क्षणमपि जीवन्नुपहास्यमात्मानं करो-

आला कीं नाहीं हें पाहून लवकर येऊन आम्हांस सांग.

**सुनंद** — आज्ञा महाराज. ( असें म्हणून निघून जातो. )

**जीमूतके०** — हे देवी; हा नागाचा चूडामणि असेल ?

( इतक्यांत लाल वस्त्रें धारण केलेला **शंखचूड** येतो. )

**शंखचूड** — हायहाय, हें काय झालें ? दैवानें मला नागविलें !

साक्या.

सिंधुतटीं गोकर्णेश्वर त्यावंदुनि शीघ्र निघालों,
अतित्वरेनें भुजंगमाच्या वध्यस्थानीं आलों,
इतक्यांतचि त्या विहंगमाच्या पतिनें अनर्थ केला,
येउनिविद्याधर चंचूनें धरोनि गगनीं नेला;
त्या पुरुषाचें नखचंचूंनीं ह्रदय फोडिलें वाटे,
कीं रक्ताचे थेंब गळाले असती हे या वाटे.

( शोक करतो. )

हा निष्कारण बांधवा ! हा परम कारुणिका! हा परदुःख दुःखिता ! हा विपत्सागरांत पडलेल्या जनांचा उद्धार करणाऱ्या नवतरंडका, हा परोपकारार्थ तृणवत् देह अर्पिणाऱ्या, महापुरुषा ! कोणीकडे गेलास ? तुझें प्रिय वचन मला एकदां ऐकूं दे. ( आपणास उद्देशून ) काय मी नष्ट मंदभाग्य हा ! म्यां वांचून काय केलें ?

साक्या.

नाहीं कीर्ति मिळविलि तैशी रक्षुनि आपुले ज्ञाती,
कीं नाहीं स्वामीची श्लाघ्या अनुष्ठिली आज्ञा ती,
अन्येंदेउनि निजदेह मला राखियलें कृपणातें ?
हाधिक् ! हा धिक् दुर्दैवानें कसें नाडिलें मातें ?

तर आतां असा दुर्दैव मी क्षणभर तरी वांचून जनांत आ-

१ नाव. २ स्तुत्य.

मीति. ततोयावदेतां रुधिरधारामनुगंतुं मयतिष्ये. ( भूमौ दत्तदृष्टिः परिक्रामति )

आदावुत्पाट्य पृथ्वीं प्रविरलपतितस्थूलबिंदुं, ततोग्रे
ग्रावण्यापातशीर्णा, प्रसृततनुकणां कीटकीर्णस्थलीषु,
दुर्लक्ष्यांधातुपीठे, वनतरुशिखरे गव्हरे शांतरूपा,
मेतां, तार्क्ष्यं दिदृक्षुर्निपुणमनुसरन् रक्तधारांव्रजामि. ८

वृद्धा० ( ससाध्वसं ) महाराअ, एसो कोवि रुदिदवअणो इदोज्जेव तुरिदं आअछदि, हिअअं मे आकुली करोति; ता जाणिअदु दाव कोएसोत्ति.

जीमूतकेतुः यथाह देवी.

शंख० हा त्रिभुवनैकचूडामणे, हा परार्थदत्तदेह, क्मया द्रष्टव्योसि ? ( इतिक्रंदति ) मुषितोस्मि भोः ! मुषितोस्मि !

जीमूतकेतुः ( आकर्ण्य सहर्षं ) देवि, मुंचविषादं नूनमस्यायं मणिः, नूनं मांसस्य लोभात् केनापि पक्षिणा समुत्क्षिप्य नीयमानोस्मिन् प्रदेशे पतितः.

वृद्धा० ( सहर्षं मलयवतीमालिंग्य ) अविहवे, पुण्णाधिए, धीराहोइ.ण इदिसी आकिदी एरिसं वेधव्व दुःखं अणु होदि.

मलयवती ( सहर्षं ) अंज्ज, तुम्ह आसिसाए. ( इति पादयोः पतति. )

जीमूतके० ( शंखचूडमुपसृत्य ) वत्स, किंतव चूडामणिरपहृतः ?

शंख० आर्य, नममैत त्रिभुवनस्यापि.

पला उपहास करून घेऊं काय ? नाहीं नाहीं. तर, ही र-क्ताची धार पडत गेली आहे, हिच्या मार्गानें जाऊन तो स-त्पुरुष कोठें आहे हें जाणण्याविषयीं मी प्रयत्न करीन. ( भू-मीकडे न्याहाळून पाहत\पाहत चालतो )

स्रग्धरा वृत्त.

प्रारंभीं बिंदु जीचे विरळचि पडले स्थूळ हे अग्रभागीं,
पाषाणीं पात होतां पसरति, जडले कीट हे जाग जागीं,
कष्टानें धूळिमध्यें, वनतरुशिखरीं, गव्हरीं, मी पहातों,
शोधाया वैनतेया अनुसरुनि अशा रक्तधारेस जातों.

**वृद्धादेवी—** ( भय पावून, ) महाराज, पहा हा कोणी रडवें तोंड करून त्वरेनें इकडे येत आहे. तेणें करून माझें न्हृदय घाबरें झालें. पहा पहा तो कोण आहे.

**जीमूतके०—** तूं म्हणतेस तें खरेंच.

**शंखचूड—** हा त्रिभुवनैक चूडामणे, हा परार्थदत्तदेहा, आतां तुला मी कोठें पाहूं ! दैवानें माझा सर्वस्वें घात केला. ( असें म्हणून रडतो. )

**जीमूतके० —** ( ऐकून हर्षपावून ) देवी चिंता करूंनको. ह्याचाच चूडामणि हा. कोणीतरी पक्ष्यानें मांसाच्या भ्रांतीनें उचलून नेला तो हा ह्या ठिकाणीं पडला, हें खचीत.

**वृद्धादेवी—** ( हर्षपावून **मलयवतीस** आलिंगून हे सौभाग्यवती, पुण्यशीले, धीर धर. अशी आकृति वैधव्यदुःख कधीं अनुभवणार नाहीं.

**मलयव० —** ( हर्ष पावून, ) आपल्या पायांचा आशीर्वाद. ( असें बोलून पायांवर पडते )

**जीमूतके० —** ( **शंखचूडाच्या** जवळ जाऊन ) वत्सा, तुझा चूडामणि हरवला काय ?

**शंखचू० —** आर्या, केवळ माझाच नाही, सर्व त्रिभुवनाचाही चूडामणि हरवला.

जीमूतके० कथमिव ?

शंख० दुःखभारोपरुद्धकंठः नशक्नोम्मि स्फुटं कथयितुं.

जीमूतके० वत्स,

आवेदयेदमात्मीयं पुत्र, दुःखं सुदुःसहं,
मयि संक्रांत, मेतत्ते येन सह्यं भविष्यति. ९

शंख० श्रूयतामिदं. शंखचूडानामा खल्वहं नागो, वैनतेयस्याहारार्थमवसरमाप्तो वासुकिना प्रेषितः. किंबहुना विस्तरेण ? कदाचिदियं रुधिरधारापद्धतिः पांसुभिरवकीर्यमाणा दुर्लक्ष्यतामुपयास्यति, अतः संक्षेपतः कथयामि.

विद्याधरेण केनापि करुणामयचेतसा
मम संरक्षिताः प्राणादत्वात्मानं गरुत्मते. १०

जीमूतके० जीमूतवाहनादन्यः कएवंपरहितव्यसनी स्यात्? ननु स्फुटमेवोच्यतां

शंख० पुत्रेण ते जीमूतवाहनेनेति.

जीमूतके० हा हतोस्मि मंदभाग्यः

वृद्धा० हीं पुत्तअ, किं तु ए एदं ?

मलयवती. हीं कथं सच्चीभूदं मे दुण्णिमित्तं.

**जीमूतके०** — कसाबरें ?

**शंखचूड०** — दुःखानें माझा कंठ दाटतो. माझ्यानें स्पष्ट सांगवत नाहीं.

**जीमूतके०** — वत्सा,

मंजुभाषिणी वृत्त.

मजला कृपाकरुनि दुःख आपलें
वद, यामुळें मजहि फार जाहलें.
तनयाविणें मजवरीहि तें पडे.
वद, काय तें मनिं धरूं नको भिडे.

**शंखचू०**— बरें तर ऐका. सांगतों. माझें नांव **शंखचूड**. नागजातीचा आहें. **गरुडाच्या** आहारार्थ पाळी आल्यावरुन नागराज **वासुकी** ह्यानें मला येथें पाठविलें. पुढली कथा लांबच आहे, ती जर मी विस्तारानें सांगूं लागलों, तर कदाचित् हा रक्त धारेचा मार्ग धुळीनें झांकला जाऊन दिसेनासा होईल, ह्या साठीं थोडक्यांत सांगतों.

ओंवी.

कोणी एक आला विद्याधर, जो केवळ करुणेचा सागर
तेणें **गरुडा** देऊन निजशरीर, माझे प्राण वांचविले १

**जीमूतके०**— असा परहितार्थ आपला देह देणारा **जीमूतवाहना** वांचून दुसरा कोण आहे ? तर आतां काय असेल तें स्पष्ट सांग.

**शंखचू०**— होय, तुझा पुत्र जो **जीमूतवाहन** त्यानेंच.

**जीमूतके०**— हाय हाय, घर बुडालें ! काय मी मंदभाग्य !

**वृद्धादेवी**— हा पुत्रा ! काय हें त्वां केलें !

**मलयव०**— हाय हाय, असें कसें झालें. ज्यीं दुश्चिन्हें झालीं त्यांनीं आपला गुण दाखविला खरा.

( सर्वेमोहंगच्छंति )

**शंख०** ( स्वगतं ) अयेनूनमेतौ पितरौ सत्यौ तस्य महासत्व स्यामियावेदनान्मयैवेत्थमवस्थांगतौ अथवा विषधर वदना द्विषमंतरेण किमन्य न्निष्क्रामति ! अहो जीवित मदस्य सदृशमुपकृतं जीमूतवाहनस्य शंखचूडेन । तत्कि- मधुनैवात्मानं व्यापादयामि ? अथवा समाश्वासयाम्ये तौ. आर्य, समाश्वसिहि, समाश्वसिहि. समाश्वसितु अंबा.

( उभौसमाश्वसितः )

**वृद्धा०** ( मलयवतीमुद्दिश्य ) वत्से, [93] उट्ठेहि. मारुअ. अम्हेवि किं जीमूदवाहणेणविणा जीवह्म तासमस्सदाव.

**मलयवती** ( समाश्वस्य ) [94] हा अज्जउत्त, कहिंदाणिं तुहमुहं पे क्खिदव्वं ?

**जीमूतके०** हा वत्स, गुरुजनशुश्रूषाभिज्ञ

चूडामणि चरणयो र्ममपातयता त्वया

लोकांतरगतेनापि नोज्झितो विनयक्रमः ११

( चूडामणिं गृहीत्वा ) हावत्स, कथमेतावन्मात्र दर्शनः संवृत्तोसि ( त्द्दिदृत्वा ) अहह !

( सर्व मूर्च्छा पावतात. )

**शंखचू०**— ( आपणाशीं ) अहो हीं त्या महापुरुषाचीं मातापितरें आहेत खचीतें. त्याचें विपरीत वर्तमान सांगून मीच ह्या उभयतांस दुःखावस्थेंत घातलें. मी बोललों नसतों तर बरें झालें असतें. अथवा विषधराच्या[1] मुखांतून विषावांचून दुसरें काय निघावयाचें आहे! अहो आपल्या साठीं जीव देणारा जो **जीमूतवाहन** त्याचे उपकार म्यां **शंखचूडानें** चांगले फेडले! असो, तर मी आतांच आपला प्राणघात करून घेऊं, अथवा ह्या दोघांस सावध करूं? आर्या, सावध हो सावध हो— माते, सावध हो.

( दोघे सावध होतात. )

**वृद्धादेवी**— ( **मलयवतीस** उद्देशून ) वत्से, मुली, ऊठऊठ. रडूं नको. आम्हीं तरी **जीमूतवाहना** वांचून वाचूं काय? तर सावध हो.

**मलयव०**— ( सावध होऊन ) हा आर्यपुत्रा, हा प्राणप्रिया, आतां तुझा मुखचंद्र मी कोठें पाहूं?

**जीमूतके०**— हा वत्सा, हा गुरुजनसेवाचतुरा,

गीति.

मच्चरणीं परलोकांहुनि चूडारत्न टाकिलें, याची
युक्ति पहातां, वाटे रीति तुवां सोडिली न विनयाची

( चूडामणि हातीं घेऊन ) हा वत्सा, येवढच दर्शन त्वां आम्हांस दिलें काय? ( उराशीं धरून ) हाय हाय!

---

1 सर्पाच्या.

भक्त्यातिदूरमवनाववनम्रमौले:,

शश्वत्तव प्रणमतश्चरणौ मदीयौ,

चूडामणिर्विकषणैर्मसृणौ व्ययं हि

गाढं विघट्टयति मे हृदयं कथंनु ? १२

**वृद्धा०** हा पुत्त, जीमूदवाहण, जस्स दे गुरुअणसुस्सूसं वज्जिअ अण्णं सुहंपिण.रोअदि, सो कहं विअ दाणिं पिदरं उज्झिअ सग्गसुह मणुभविदुं गदोसि ?

**जीमूतके०** ( सास्रं ) देवि, वयंकि जीमूतवाहनेनविनापि जीवाम: येनैवं प्रलपसि ?

**मलयवती.** ( पादयोर्निपत्य कृतांजलि: ) तादं, देहि मे अज्ज उत्तस्स अंगाहरणचिन्हं चूडारअणं, जेण एदं हिअएकरिअ जलणप्पवसेण अवणेमि अत्तणो संदावदुःखं.

**जीमूतके०** अयि पतिव्रते, किमाकुलासि ! ननु सर्वेषामेवास्माकमयं निश्चय:.

**वृद्धा०** महाराअ, ताकिं पडिवालीअदि. ?

**जीमूतके.** देवि, नकिंचित्. किंत्वाहिताग्नेर्नान्येनाग्निना संस्कारोविहित, स्ततोग्निहोत्रशरणादग्नीनादायागच्छ, येनात्मानं व्यापादयामि.

**शंख०** ( स्वगतं ) कष्टं ममैकस्य पापस्यार्थे सकलं विद्याधर कुलं विच्छिन्नं तदेतत्तावत् ! ( प्रकाशं ) तात, न खल्ववे

वसंततिलकावृत्त.

भक्ती करूनि लवलासि दुरूनि मातें,
तूं नित्यकीं करिशि वंदन मत्पदातें,
तेणें झिजूनि पुणि हा मउ फार झाला,
माझ्या; पहा तरि कसा रुततो उराला,

**वृद्धादेवी**— हा पुत्रा **जीमूतवाहना,** ज्या तुला गुरुशुश्रूषे वांचून दुसरें सुख आवडत नव्हतें, तो तूं ह्या समयीं वृद्ध पितरांस टाकून स्वर्गसुखाचा अनुभव घ्यावयास कसा रे गेलास ?

**जीमूतके०**— ( डोळ्यांस अश्रु आणून, ) देवी, आपण काय **जीमूतवाहना** वांचून जगणार आहों ह्मणून तूं इतका विलाप करितेस ?

**मलयव०**— ( सासऱ्याच्या पायांवर मस्तक ठेवून, हात जोडून, विज्ञापना करिते. ) मामाजी, आर्य पुत्राचें भूषण जें चूडारत्न, तें मजपाशीं कृपाकरून द्या. तें मी आपल्या ऱ्हदयाशीं धरून अग्निप्रवेश करून आपल्या संताप दुःखाचा परिहार करितें.

**जीमूतके**— हे पतिव्रते, तूं इतकी घाबरी कां झालीस ? आह्मा सर्वांचाही तोच निश्चय आहे.

**वृद्धादेवी**—महाराज, मग उशीर कां ? वाट कोणाची पाहतां ?

**जीमूतके०**— अगे वाट कशाची ? पण आहिताग्नीला[1] लौकिकाग्नीनें संस्कार विहित नाहीं. ह्यासाठीं होमशाळेंत जाऊन होमकुंडांतील अग्नि घेऊन ये. त्या अग्नीनें आपलें देह जाळून घेऊं.

**शंखचू०**— ( मनांत म्ह० ) हाय हाय, मज एका पाप्याकरितां सकल विद्याधरकुल नष्ट होत आहे. आतां काय करावें ?

---

१ ज्यानें अग्निहोत्र घेतलें आहे तो.

मनिश्चित्यैव युक्तं साहसमनुष्ठातुं. विचित्राणि विधेर्विलसितानि. कदाचिन्नायं नाग इति विज्ञाय जीवंतमेव जीमूतवाहनं परित्यजेन्नागशत्रुः. तदनयैव रुधिरधारया वैनतेयमनुसरामः."

**वृद्धा०** सव्वधा देवदाणं पसाएण जीवंतं जेव्व पुत्तअं पेक्खिस्सं.

**मलयवती** ( स्वगतं ) दुल्लहं खु एदं मह मंदभाअधेआए.

**जीमूतके०** अवितथैषाभारती भवतु. तथापि साग्नीनामेवास्माकं युक्तमनुसर्तुं. तत्तामनुसरतुभवान्, वयमप्यग्निशरणादग्नीनादायत्वरितमेवागच्छामः ( इतिपत्नी वधूसमेतोनिष्क्रांतोजीमूतकेतुः )

**शंख०** ततोहमेकएव गरुडमनुसरामि ( परिक्रम्याग्रतोनिर्वर्ण्य च ) अये !

कुर्वाणो रुधिरार्द्रचंचुकषणैर्द्रोणीरिवाद्रेःशिलाः,
क्लिष्टोपांतवनांतरः स्वनयनज्योतिःशिखाश्रेणिभिः
सज्जद्वज्रकुठारघोरनखरप्रांतावगाढावनिः
शृंगाग्रे मलयस्य पन्नगरिपुर्दूरादयं दृश्यते. १३

( ततः प्रविशत्यासनस्थः पुरः पातितनायको गरुडः )

( उघडपणें ) हे ताता, असें करूंनका. **जीमूतवाहनाचें** मरण निश्चित झाल्या वांचून असें साहस करणें आपणास योग्य नाहीं. दैवाचे खेळ विचित्र आहेत. कदाचित हा नाग नव्हे असें समजून **पक्षिराज जीमूतवाहना**ला जिवंतच सोडून देईल. ह्यासाठीं ह्या रक्तधारेच्या अनुलक्ष्येंकरूनच आपण **गरुडा**पर्यंत जाऊं चला.

**वृद्धादेवी**— तुझ्या तोंडांत साखर पडो. सर्वथा देवतांच्या प्रसादानें मी माझा पुत्र जिवंतच पाहीन.

**मलयव**०— ( मनांत ) मला दुर्भाग्येला ही गोष्ट दुर्लभ आहे.

**जीमूतके**०— बाबारे, ही तुझी वाणी खरी होवो. तथापि अग्नि घेऊन ह्या मार्गास अनुसरावें हें योग्य. ह्यासाठीं तूं पुढें चल. आम्हीही होमशाळेंतून अग्नि घेऊन तुझ्या पाठोपाठच येतों. ( असें म्हणून पत्नी आणि सून ह्यां सहवर्तमान निघून जातो. )

**शंखचू**० बरें तर मी एकटाचे **गरुडा**चा शोध काढीत जातों ( पुढें जाऊन अग्रभागीं पाहून म्हणतो. ) अरे, हाचतो.

शार्दूल विक्रीडितवृत्त.

घांसोनी रुधिरार्द्र[1] चंचु करि जो द्रोणी[2]गिरीच्या शिला,
जाळीजो नयनोत्थ[3] तेजनिकरें वृक्षांचिया राशिला[4]
बैसेवज्रकठोर घोर नखरें[5] रोवोनि भूमींत तो,
शृंगाग्रीं मलयाद्रिच्या अहिरिपू[6] लांबूनियां दीसतो.

( इतक्यांत पुढें नायक पडला आहे, आपण आसनावर बसला आहे असा **गरुड** येतो. )

---

१ रक्तानें भरलेली चोंच. २ द्रोणी. ३ डोळ्यापासून निघालेल्या तेज समुदायानें. ४ वृक्षसमुदायास ५ नखें. ६ गरुड.

**गरुडः**. ( आत्मगतं ) आजन्मनःप्रभृति भुजंगपतीन्ममाश्न तोनचेदमीदृशमन्याश्चर्यंदृष्टपूर्वं. यदयं महासत्वोनकेवलं विपद्यते, प्रत्युतहृष्टइव किमपि दृश्यते. ( सविस्मयं ) तथाहि,

ग्लानिर्नाधिकपीयमानरुधिरस्याप्यस्ति धैर्योदधे,
मांसोत्कर्षणजारुजोपिवहतः प्रीत्या प्रसन्नं मुखं,
गात्रं यन्नविलुप्तमेषपुलकस्तत्रस्फुटोलक्ष्यते,
दृष्टिर्मय्युपकारिणीव निपतत्यस्यापकारिण्यपि. १४

तत्कुतूहलमेवमेजनितमस्यानयाधैर्यवृत्त्या. तद्भवतु न भक्षयाम्येनं. जानामितावत्कोयमिति. ( उपरतोभक्षणात्पुरस्तिष्ठति )

**नायकः**

शिरामुखैः स्यंदत एव रक्त,
मद्यापि देहे मम मांसमस्ति,
तृप्तिंन पश्यामि तवापि देहे,
किं भक्षणात्त्वं विरतो गरुत्मन्. १५

**गरुड**—(आपल्या मनांत म्हणतो.) मी जन्मापासून मोठ मोठे भुजंग खात आलों, पण असें आश्चर्य मीं कधींच पाहिलें नाहीं. अरे मीं वज्रासारख्याचंचूनें ह्याचें ऊर फोडीत असतां हा हाय देखील म्हणत नाहीं; उलटा हर्षित दिसतो. तस्मात् हा कोणी महात्मा असावा (आश्चर्य करून)

ओंव्या.

जरीमी माशितों रगत, तरी यातें ग्लानी नाहीं होत,
धैर्य याचें मला दिसत, सागरापरी अगाध. १
घेतों मांस मी तोडून, हा तयाचें दुःख साहून,
प्रसन्न वदन होऊन; पाहतसे मजकडे. २
गात्रीं रोमांच थाटला, जाणो ह्दयीं आनंद दाटला,
ऐसा स्पष्ट हा मज वाटला, पाहतांची. ३
जरी मी याचा अपकारी, तरी हा मानितो उपकारी,
ऐसी स्निग्धदृष्टी मज वरी, दिसते याची. ४

तर ह्याच्या ह्या धैर्य वृत्तीनें मला मोठें कौतुक उत्पन्न केलें. असो, अगोदर ह्याला खाऊंनये. हा कोण आहे ह्याची चौकशी करावी. (खावयाचें सोडून त्याजकडे पाहत उभा राहतो.)

**नायक**— हे पक्षिनायका, हूं चालूं दे.

इंद्रवज्रावृत्त.

नाडींतुनी आजुनि रक्त वाहे,
देहांतही मांस अजूनि आहे,
तुझ्या नतृप्ती जठरानलास,
कांभक्षणा सोडुनि थांबलास ?

गरुडः (स्वगतं) अहो, महदाश्चर्य ! कथममयमस्यामप्यव-स्थायां मूर्जितमेवाभिधत्ते. (प्रकाशं) अहो महासत्व,

आवर्जितं मयाचंच्वा ह्रदयात्तव शोणितं,

धैर्येणानेनच ह्रतं त्वया ह्रदयमेव मे. १६

नायकः- एवं क्षुधाकुलोभवान्नश्रवणयोग्यः तत्कुरुष्व प्रथमं तावच्छोणितमांसैनैवतृप्तिं.

शंखचू० (ससंभ्रममुपसृत्य) तार्क्ष्य, तार्क्ष्य, न खलुसाहसमनुष्ठातव्यं. नायंनागः. परित्यजैनं, मां भक्षय. अयमहं तवाहारार्थं वासुकिनाप्रेषितः (इत्यभिधाय पुरोवपुर्दधाति.)

नायकः (शंखचूडं पश्यन् आत्मगतं) कथं विफलीकृतो मनोरथः शंखचूडेनागच्छता !

गरुडः (उभौ निरूपयन्) द्वयोरपि भवतोर्वध्यचिन्ह मस्ति. कतरः खलु नाग इति नावगच्छामि.

शंखचू० कथमस्थान एव भवतो भ्रांतिः ?

आस्ते स्वस्तिकलक्षणं, न कथितं किं कंचुको यत्तनौ

**गरुड** — ( मनांत म्ह० ) अहो, हें मोठें आश्चर्य ! अशा अवस्थेंतही हा धैर्य आणि औदार्य दाखवितो ! ( उघडपणें. ) हे महापुरुषा,

गीति.

ह्या चंचूनें तुझिया ऱ्हदयांतिल रक्त मात्र[1] म्यां वेरिलें;
परिनिज धैर्य माझें ऱ्हदयचि सारें खरें तुवां हरिलें.

**नायक** — आपण क्षुधेनें व्याकुळ आहां. ह्यासाठीं ही बोलावयाची वेळ नव्हे. अगोदर माझ्या रक्त मांसांनीं आपल्या क्षुधेची शांति करावी. मग काय बोलणें तें बोलावें.

**शंखचू०** — ( घाबऱ्या घाबऱ्या जवळ जाऊन ) अरेरे, पक्षिराजा, हें साहस करूंनको. अरे, तो नाग नव्हे. सोंड सोड. त्याला भक्षूंनको. तुझ्या आहाराकरितां **वासुकीनें** पाठविलेला तो मी आहें. मला खा. ( असें बोलून **गरुडा** पुढें आपलें शरीर ठेवतो )

**नायक** — ( **शंखचूडाला** पाहून मनांत म्ह० ) हरहर, **शंखचूडानें** येथें येऊन माझा मनोरथ निष्फळ केला. हा कशाला आला ?

**गरुड** — ( दोघांकडे पाहून ) अरे तुम्हां दोघांच्याही आंगांवर वध्यचिन्ह आहे. ह्यांत नाग कोण हें मला समजत नाहीं.

**शंखचू०** — काय ही तुला भलतेच ठिकाणीं भ्रांति कशी ? अरे नीट पहा.

अभंग.

आहेमाझेशिरींस्वस्तिकलक्षण, नाहींकायखूणजाणीयली; १
माझ्यादेहावरीआहेकींकंचूक, नेणसीकौतूकवाटेमज. २

---

१ घेतलें.

